# स्त्री

## आणि

# निसर्गनियम

लेखक

सय्यद अबुल आला मौदूदी

भाषांतर

मुबारक हुसैन मनियार

# अनुक्रमणिका

''अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे''

अल्लाहने सर्व प्राण्यांप्रमाणे मनुष्याचीसुद्धा 'जोडी' बनविली. त्यांना एकमेकांसाठी स्वाभाविक ओढ असते. दुसऱ्या प्राण्यांच्या अभ्यासावरून असे कळते की, त्यांच्यात यास जातीय (नर-मादीसंबंधी) विभाजनाचे व या स्वाभाविक आकर्षणाचे ध्येय फक्त विशिष्ट जातीचे अस्तित्व टिकवणे आहे. म्हणूनच त्यांच्यात हे आकर्षण फक्त तितकेच ठेवले गेले आहे, जितके प्रत्येक जात टिकून राहण्यासाठी आवश्यक आहे. त्यांच्या स्वभावात अशी नियंत्रणशक्ती ठेवली गेली आहे, जी त्यांना कामसंबंधात त्या ठराविक मर्यादेचे उल्लंघन करू देत नाही. या उलट माणसांत ही अभिरुची असीमित, अनियंत्रित आणि सर्व इतर प्राण्यांपेक्षा अधिक आहे. त्यांच्यासाठी वेळ आणि काळाचे कोणतेही बंधन नाही. त्यांच्या स्वभावात अशी कोणतीही नियंत्रणशक्तीसुद्धा नाही जी त्याला एका विशिष्ट मर्यादेवर मज्जाव करील. पुरुष व स्त्रीमध्ये एकमेकांसाठी स्थायी आकर्षण असते. त्यांच्यात एकमेकाला आकर्षित करण्याचे अपरिमित साधने एकत्रित केली गेली आहेत. त्यांच्या हृदयात विरूद्ध लिंग-जातीबद्दल प्रेम व अनुरक्ततेची एक प्रबळ प्रेरणा ठेवली गेली आहे. त्यांच्या शरीराची रचना आणि त्याचा डौलदारपणा, रंग-रूप आणि त्याचा स्पर्श व त्याच्या अंगप्रत्यांगात विरुद्ध लिंग-जातीसाठी आकर्षण उत्पन्न केले गेले आहे. त्यांचा आवाज, गती, चाल प्रत्येक गोष्टीत आकर्षित करण्याची शक्ती भरली गेली आहे. सभोवतालच्या जगातसुद्धा असली असंख्य साधने निर्माण केली गेली आहेत जी दोघांच्या लैंगिक प्रेरणांना गतिमान करतात आणि त्यांना एकमेकांकडे जाण्यास प्रवृत्त करतात. वाऱ्याचे घोंगावणे, पाण्याचा प्रवाह, गवताची हिरवळ, फुलांचा सुगंध, चिमण्यांची चिवचिव, आकाशातील मेघ, चांदण्या रात्रीचे माधुर्य: तात्पर्य असे की, निसर्गाच्या सौंदर्याची लोभनीय शैली आणि ब्रह्मांडाच्या सौदर्याचे चित्र प्रत्यक्ष अथवा परोक्ष रूपाने त्या प्रेरणा गतिमान करण्यास कारणीभूत ठरतात.

याशिवाय माणसाच्या शारीरिक व्यवस्थेचे निरीक्षण केल्यास कळते की यात जो शक्तीचा मोठा खजिना ठेवला गेला आहे, त्यात एकाच वेळी जीवनशक्ती आणि कार्यशक्तीसुद्धा आहे व कामसंबंधी शक्तीसुद्धा. याच ग्रंथी ज्या त्याच्या अवयवांना जीवनरस देतात आणि त्यात स्फूर्ती, सामर्थ्य, बुद्धिमत्ता व कार्यक्षमता उत्पन्न करतात.

त्यांनाच ही सेवादेखील सूपुर्द केली गेली आहे की, त्यांनी त्यात कामविषयक शक्तीदेखील उत्पन्न करावी. या शक्तीला गतिमान बनविणाऱ्या भावनांचा विकास करावा. या भावना उत्तेजित करण्यासाठी सौदर्य, रूप, आकर्षकता आणि शोभेच्या विविध साधनांना एकत्र करावे आणि या साधनांतून प्रवाहित होण्याची क्षमता त्याचे डोळे, त्याचे कान आणि त्याच्या घ्राणेंद्रियात व स्पर्शेंद्रियात, येथपावेतो की त्याच्या कल्पनाशक्तीतसुद्धा एकत्र करावे.

निसर्गाची हीच कार्यशक्ती मनुष्याच्या मानसिक शक्तीमध्येसुद्धा आढळते. त्याच्या मनात जितक्या प्रेरकशक्ती आढळतात, त्या सर्वांचा संबंध दोन प्रबळ संकल्पांशी असतो. एक तो संकल्प जो त्याला आपल्या स्वत:च्या अस्तित्वाच्या रक्षणासाठी व आपल्या स्वत:च्या सेवेसाठी तत्पर करतो. दुसरा तो संकल्प जो आपल्या विरुद्ध लिंग-जातीशी संबंध ठेवण्यास भाग पाडतो. तारुण्यात जेव्हा मनुष्याची कार्यकारी शक्ती आपल्या चरमसीमेवर असते, तेव्हा दुसरा संकल्प इतका प्रबळ असतो की कधीकधी तो पहिल्या संकल्पाला दाबून टाकतो आणि मनुष्य त्याच्या इतका आहारी जातो की त्याला आपले प्राणसुद्धा गमवावे लागते. स्वत:ला विनाशाच्या गर्तेत समजूनउमजून ढकलण्यास त्याला यत्किंचितसुद्धा लाज वाटत नाही.

# संस्कृतीरचनेवर याचा परिणाम

हे सर्व काही कशासाठी आहे? केवळ विशिष्ट जातीच्या अस्तित्वासाठी हे आहे काय? नाही. कारण मानवजातीचे अस्तित्व टिकवून ठेवण्यासाठी तितक्या प्रमाणात संततीच्या उत्पत्तीचीसुद्धा गरज नाही, जितकी मासे, शेळ्यांसारख्या अन्य प्राण्यांसाठी आहे. मग याचे काय कारण आहे की निसर्गाने अन्य प्राण्यांपेक्षा अधिक विरुद्ध लिंग-जातीचे आकर्षण माणसात ठेवले आहे आणि त्यासाठी सर्वांत जास्त उत्तेजित करणारी साधने उपलब्ध करून दिली आहेत? ते केवळ माणसाच्या भोगविलास आणि रसास्वादनासाठी आहेत काय? असेही नाही निसर्गाने कोठेही मनोरंजन आणि रसास्वादनाला उद्दिष्ट बनविलेले नाही. हे तर मनुष्य व अन्य प्राण्यांना एखाद्या महान उद्देशाच्या सेवेसाठी भाग पाडण्याकरिता स्वाद व रसास्वाद तोंडलावणी म्हणून देत असतो. आता विचार करा की, या बाबतीत कोणता महान उद्देश निसर्गासमोर आहे? आपण जितका विचार कराल, एखादे अन्य कारण याशिवाय आपल्या लक्षात येणार नाही की निसर्ग, अन्य प्राण्यांच्या उलट मानवजातीला सभ्य व सुशील बनवू इच्छितो. म्हणूनच मानवाच्या हृदयात विरुद्ध लिंगासाठी प्रेम व ममतेचा तो संकल्प ठेवला गेला आहे जो केवळ शरीरसंबंध व सन्तानोत्पत्ती क्रियेचीच निकड दर्शवितो असे नव्हे, तर एक टिकाऊ साहचर्य, हार्दिक संबंध व आध्यात्मिक जवळिकीची निकडदेखील भासवितो.

म्हणूनच माणसात विरुद्ध लिंग-जातीविषयी आकर्षण, त्याच्या यथार्थ कामशक्तीपेक्षा कितीतरी अधिक ठेवले गेले आहे. जर त्याच प्रमाणात, नव्हे तर एकास-दहाच्या प्रमाणात त्याने संततीला जन्म दिला, तर त्याचे आरोग्य बिघडेल आणि दीर्घ आयुष्याला पोहचेपर्यंत त्याची शारीरिक शक्ती संपुष्टात येईल. या गोष्टीचे हे उघड प्रमाण आहे की, मनुष्य परलिंग-जातीच्या आकर्षणाच्या आधिक्याचा अर्थ असा नाही की, त्याने अन्य प्राण्यांपेक्षा अधिक संभोग करावा, तर याचा अर्थ असा आहे की, स्त्री व पुरुषाची एकमेकांशी बांधिलकी असावी आणि त्यांच्या पारस्परिक संबंधात स्थायित्व व दृढता उत्पन्न केली जावी.

म्हणूनच स्त्रीस्वभावाताच जातीय आकर्षण व कामवासनेबरोबरच लज्जा, संकोच, नकार, पलायन व मज्जावासारखे गुण ठेवले गेले आहेत; जे कमीअधिक

प्रमाणात प्रत्येक स्त्रीमध्ये आढळतात. ही संकोच व पलायनची प्रवृत्ती जरी अन्य प्राण्यांच्या माद्यांमध्येसुद्धा दिसून येते. तरी मानवाच्या नारीजातीत याची शक्ती आणि प्रमाण फार अधिक आढळते आणि ती लज्जा व संकोच्याच्या भावनेद्वारा अधिक तीव्र केली गेली आहे. यावरूनसुद्धा कळते की, मनुष्यात जातीय आकर्षणाचे ध्येय हा एक स्थायी संबंध आहे. असे नव्हे की, प्रत्येक जातीय आकर्षण केवळ मैथुनक्रियेचा परिणाम आहे.

म्हणूनच मनुष्याच्या अपत्याला सर्व अपत्यांपेक्षा अधिक निर्बल व विवश निर्माण केले गेले आहे. अन्य प्राण्यांच्या उलट मनुष्याच्या अपत्याला अनेक वर्षांपर्यंत आईवडिलांच्या संरक्षण व देखरेखीची गरज असते आणि त्यात आपल्या स्वत:ला सांभाळण्याची व स्वबळावर जगण्याची क्षमता फार उशिरा येते. याचा अर्थ असा आहे की, स्त्री-पुरुषाचे संबंध केवळ लैंगिक संबंधापर्यंत मर्यादित राहू नयेत, तर या संबंधाच्या परिणामाने त्यांना परस्पर सहयोग व सहकार्यास भाग पाडावे.

म्हणूनच मानवाच्या हृदयात इतर सर्व प्राण्यांपेक्षा आपल्या संततीबद्दल अधिक प्रेम ठेवले गेले आहे. अन्य प्राणी काही दिवसांपर्यंत आपल्या संततीची देखरेख केल्यानंतर त्यांच्यापासून वेगळे होतात; मग त्यांच्यात कोणताही संबंध उरत नाही. नंतर ते एकमेकांना ओळखतसुद्धा नाहीत. या उलट मनुष्य प्रारंभिक पालनपोषण काळ निघून गेला तरी संततीच्या प्रेमपाशात जखडलेला राहतो; येथपावेतो की हे प्रेम संततीच्या संततीपर्यंत चालत राहते. माणसाची स्वार्थपरक पशुतासुद्धा या प्रेमाच्या अधीन इतकी राहते की, जे काही तो केवळ स्वत:साठी इच्छितो त्यापेक्षा कितीतरी अधिक तो आपल्या संततीसाठी इच्छितो. त्याच्या हृदयात आतून ही इच्छा उत्पन्न होते की, जितकी शक्य होईल तितकी उत्तमोत्तम सामुग्री आपल्या संततीसाठी एकत्रित करावी आणि आपल्या परिश्रमाचे फळ त्यांच्यासाठी सोडून जावे. ही तीव्र प्रेमभावना उत्पन्न करण्यात निसर्गाचे ध्येय केवळ असेच असू शकेल की, स्त्री व पुरुषाच्या लैंगिक संबंधांना एक स्थायी संबंधात परिवर्तीत करावे आणि त्या स्थायी संबंधाला कुटुंबव्यवस्थेचे साधन बनवावे. शिवाय नातेसंबंधाने प्रेमाच्या माध्यमाने अनेक कुटुंबांना विवाहसंबंधाद्वारे परस्परांना जोडत जावे. याशिवाय प्रेम व प्रियजनांच्या संयोगामुळे त्यांच्यात सहयोग व सहकार्याचा संबंध उत्पन्न करावा आणि अशा प्रकारे एक संस्कृतीव्यवस्था अस्तित्वात यावी.

# संस्कृतीची मूळ समस्या

यावरून असे कळते की हे सजातीय आकर्षण मानवी शरीराच्या रक्तात आणि त्यांच्या हृदयाच्या कानकोपऱ्यात वसलेले आहे. त्याच्या साहाय्यासाठी प्रचंड प्रमाणात सृष्टीच्या कणाकणांत साधने व प्रेरणा एकत्रित केल्या गेल्या आहेत. त्यामागील उद्देश असा आहे की, मनुष्याच्या वैयक्तिकतेला सामाजिकतेकडे प्रवृत्त करावे. निसर्गाने या आकर्षणाला मानवसंस्कृतीची मूळ प्रेरकशक्ती बनविले आहे. याच मोहकता व आकर्षणाद्वारे मानवाच्या दोन जातीत (स्त्री-पुरुष) आपुलकी उत्पन्न होते आणि नंतर या आपुलकी व जवळिकीने सामाजिक जीवनाचा प्रारंभ होतो.

जेव्हा हे सिद्ध झाले तेव्हा हेसुद्धा आपोआप स्पष्ट झाले की, स्त्री-पुरुषाच्या संबंधांची समस्या वास्तविकत: संस्कृतीची मूळ समस्या आहे. तिच्याच अचूक सोडवणुकीवर संस्कृतीची सुधारणा व बिघाड, तिचा उत्कर्ष व अपकर्ष आणि तिचे स्थैर्य व अस्थिरता अवलंबून आहे. मानवजातीच्या या दोन्ही भागांत एक संबंध पाशविक (अथवा दुसऱ्या शब्दांत विशुद्ध लैंगिक आणि कामवासनायुक्त) आहे, ज्याचा उद्देश मानवजात अस्तित्वात ठेवण्याव्यतिरिक्त काहीही नाही आणि दुसरा संबंध मनुष्यतेचा आहे, ज्याचे ध्येय असे आहे की, दोघांनी (स्त्री-पुरुष) मिळून संयुक्त स्वार्थासाठी आपापल्या योग्यता व आपापल्या नैसर्गिक क्षमतेनुसार काम करावे. या सहयोगासाठी त्यांचा सजातीय प्रेमसंबंध एखाद्या सूत्राची भूमिका वठवितो. ते पाशविक व मनुष्यतेचे असे दोन्ही गुण मिळून एकाच वेळी त्यांच्याकडून संस्कृतीचा कारभार चालविण्याची सेवा करून घेतात. हा कारभार चालू ठेवण्यासाठी आणखी अधिकाधिक व्यक्तींना एकत्रित करण्याची सेवासुद्धा संस्कृतीची जडणघडण व बिघाड यावर अवलंबून आहे की, या दोन्ही गुणांचे सामंजस्य अत्यंत संतुलित व अत्यंत योग्य असावे.

# शुद्ध संस्कृतीसाठी आवश्यक उपाय

या, आता आम्ही या समस्येचे विश्लेषण करून हे जाणून घेऊ की, एका शुद्ध संस्कृतीसाठी स्त्री-पुरुषाच्या पाश्विक व मानसिक संबंधामध्ये संतुलित व समुचित सामंजस्य निर्माण करण्याचे कोणते उपाय आहेत. या सामंजस्यावर असंतुलनाच्या कोणकोणत्या रूपांचा प्रभाव पडल्यामुळे संस्कृतीत बिघाड उत्पन्न होतो.

# जातीय आकर्षणात संतुलन

सर्वांत महत्त्वाचा व पहिला प्रश्न खुद्द त्या सजातीय मोहकता व आकर्षणाचा आहे की, त्यास कोणत्या प्रकारे नियंत्रणात ठेवावे? वर सांगितले गेले आहे की मनुष्यात हे आकर्षण सर्व प्राण्यांपेक्षा कितीतरी प्रबळ आहे. इतकेच नव्हे की, मानवी शरीरात या कामोत्तेजक शक्ती अधिक प्रबळ आहेत, तर बाहेरसुद्धा या विशाल सृष्टीत चोहीकडे असंख्य कामोद्दीपक प्रेरणा पसरलेल्या आहेत. माणसानेसुद्धा आपल्या प्रयत्न व शोधकशक्तीचा उपयोग करून ती वाढवण्याची व तिचा उत्कर्ष करण्याची साधने एकत्रित करण्याची सुरूवात केली. त्याने अशी समाजव्यवस्था स्वीकराली, ज्यात त्याची कामवासना वाढत जावी आणि ही तहान शमविण्याच्या सवलतीसुद्धा निर्माण केल्या. तर हे स्पष्ट आहे की, अशा स्थितीतही मनुष्य योग्य सीमेचे उल्लंघन करील. मनुष्याचा पाशविक गुण त्याच्या मानसिक गुणावर पूर्णपणे आच्छादित होईल आणि ही पाशविकता त्याची मानसिकता आणि त्याची संस्कृती दोघांना गिळंकृत करून टाकील.

सजातीय (लिंग विचाराने) संबंध आणि त्याच्या सूत्रांपैकी व प्रेरकांपैकी प्रत्येक गोष्टीला निसर्गाने रसाळ बनविले आहे. परंतु जसा आम्ही अगोदरच संकेत केलेला आहे, निसर्गाने या रसास्वादनाची चव केवळ आपल्या उद्देश्य अर्थात संस्कृती निर्मितीसाठी घातली आहे. या चवीचे मर्यादेपेक्षा अधिक वाढणे व त्याच्यातच माणसाने गुरफटून राहणे, केवळ संस्कृतीच्याच नव्हे तर खुद्द माणसाच्यासुद्धा विनाशाचे कारण बनू शकते, बनत आहे आणि पुन्हा पुन्हा बनलेले आहे. जी राष्ट्रे नष्ट झालेली आहेत, त्यांचे भग्नावशेष व त्यांचा इतिहास पहा त्यांच्यात कामवासनेने सीमोल्लंघन केले होते, त्यांचे साहित्य अशा प्रकारच्या कामोद्दीपक विषयांनी भरलेले आढळते. त्यांच्या कल्पना, त्यांच्या कथा, त्यांच्या कविता, त्यांची चित्रे, त्यांच्या मूर्ती, त्यांचे उपासनास्थान, त्यांचे भवन; सर्व काही याची साक्ष देतात. जी राष्ट्रे हल्ली विनाशाकडे जात आहेत, त्यांची स्थितीसुद्धा पाहण्याजोगी आहे. त्यांनी जरी आपल्या कामुकतेला कला आणि ललित वाङमय व सौंदर्यप्रेम आणि अशा कितीतरी गोंडस 'निर्दोष' नावांनी संबोधले तरी वास्तविकता बदलत नाही. याचे कारण काय आहे की, समाजात स्त्रीला स्त्रियांपेक्षा पुरुषांचा संपर्क व पुरुषाला पुरुषापेक्षा स्त्रीची संगत अधिक पसंत आहे? असे का की, स्त्रियांत व पुरुषांत शृंगाराची आवड वाढत चालली आहे? याचे कारण काय आहे की, संमिश्र समाजात स्त्रीचे शरीर वस्त्रामधून बाहेर डोकावत असते?

ती कोणती गोष्ट आहे, ज्यामुळे स्त्री आपल्या शरीराच्या प्रत्येक अवयवाला उघडून स्पष्ट करून दाखवीत आहे आणि पुरुषांकडून 'आणखी थोडे, आणखी थोडे'ची मागणी होत आहे? याचे कारण काय आहे की, नग्न चित्र, नग्न मूर्ती आणि वस्त्रहीन नृत्य सर्वांत अधिक पसंत केले जातात? याचे कारण काय आहे, की चित्रपटात तोपर्यंत आनंद प्राप्त होत नाही, जोपर्यंत प्रणय व प्रेमाचा मसाला नसेल आणि त्याउपर लैंगिक संबंधाचे अनेक तोंडी व कृतीने त्या सूत्रांची वाढ केली नसेल? ही आणि असलीच कार्ये जर कामवासनेचे द्योतक नसतील तर मग कोणत्या गोष्टीचे आहेत? ज्या संस्कृतीत असले असंतुलित कामोत्तेजक वातावरण निर्माण झाले तर त्याचा परिणाम विनाशाव्यतिरिक्त अन्य काय होऊ शकेल?

अशा वातावरणात कामवासनेची तीव्रता, निरंतर उत्तेजन आणि अनंत प्रेरणेमुळे हे खचितच आहे की, संतती निर्बळ जन्मेल. शारीरिक व मानसिक शक्तींचा विकास होणार नाही, बौद्धिक प्रवृत्ती अस्तव्यस्त होतील.[१] दुराचारांची वृद्धी होईल. घातक रोगांचा प्रसार, गर्भनिरोध, गर्भपात आणि बालहत्या यासारख्या मोहिमा सुरू होतील. स्त्री-पुरुषांचे मिलन पशुप्रमाणे होऊ लागले, येथपावेतो की, निसर्गाने त्यांच्यात जे सजातीय आकर्षण सर्व प्राण्यांपेक्षा अधिक ठेवले आहे, त्याचा ते निसर्गाच्या

१. एक डॉक्टर लिहितो की, प्रौढावस्थेचा प्रारंभिक काळ अत्यंत महत्त्वपूर्ण परिवर्तनासमवेत येतो. मन आणि शरीराच्या विभिन्न क्रियेत त्या वेळी एक क्रांतिकारी स्थिती उत्पन्न होते आणि सर्वच दृष्टीने सामान्य विकास सुरू होतो. मनुष्याला त्या वेळी हे परिवर्तन सहन करण्यासाठी व या विकास व बुद्धीला प्राप्त करण्यासाठी आपल्या संपूर्ण बळाची आवश्यकता असते. याच कारणास्तव रोगांच्या प्रतिकाराची शक्ती त्या वेळी मनुष्यात कमी होते सामान्य विकास, अवयवांची वाढ आणि मानसिक व शारीरिक परिवर्तनाची ही दीर्घ प्रक्रिया, ज्यात मनुष्य बाल्यावस्थेतून प्रौढावस्थेत प्रवेश करतो, एक अशी कंटाळवाणी प्रक्रिया आहे, ज्यात मानव-स्वभाव घोर परिश्रम करतो, अशा स्थितीत त्यावर एखादे असाधारण ओझे टाकणे योग्य नव्हे - मुख्यत: कामवासना व कामोत्तेजक प्रेरणा तर त्याच्यासाठी विनाशकारी आहेत. एक अन्य मानसशास्त्र व समाजशास्त्राचा विशेषज्ञ लिहितो - ''लैंगिक अवयवांचा संबंध ज्याअर्थी चव आणि जोशाच्या असामान्य संवेदनेशी आहे त्याअर्थी हे अवयव आमच्या मानसिक शक्तीपैकी एक मोठा भाग आपल्याकडे ओढून नेण्यास अथवा अन्य शब्दांत त्यावर डाका घालण्यास सदैव तत्पर असतात. जर त्यांना संधी मिळाली तर हे माणसाला समाज व संस्कृतीच्या सेवेऐवजी वैयक्तिक भोगविलासांत गुंतवून ठेवतात. हे बलशाली स्थान, जे त्यांना मानवी शरीरात प्राप्त आहे, मानवाच्या सजातीय जीवनाला लहानशा चुकीने संतुलित स्थितीपासून असंतुलनाकडे नेऊन लाभदायकतेपासून हानिकारक बनवू शकतात. शिक्षणाचा सर्वांत मोठा उद्देश्य हाच असणे आश्यक आहे की त्याने या संकटाला मज्जाव करावा.''

उद्देशाविरुद्ध प्रयोग करू लागले आणि आपल्या पाशविकतेत त्यांनी अन्य जनावरांवर मात केली, येथपावेतो की माकड व बकऱ्यांना पाठीमागे टाकले, तर निश्चितपणे ही असली प्रबळ पाशविकता मानवसंस्कृती व सभ्यतेलाच नव्हे तर खुद्द मानवतेलासुद्धा सर्वनाशाप्रत नेईल आणि जे लोक यात अडकतील त्यांचे नैतिक पतन त्यांना इतक्या खालच्या पातळीवर नेईल की जेथून त्यांचा पुन्हा उद्धार होणे अशक्य होईल. (समलैंगिकता त्याचेच उदाहरण आहे.)

असाच भयंकर परिणाम त्या संस्कृतीचासुद्धा होईल जी या समस्येच्या दुसऱ्या टोकाला आहे. जसे सजातीय (लिंगभेदाच्या दृष्टीने) आकर्षणाचे सीमोल्लंघन घातक आहे, तसेच त्याला हद्दीपेक्षा जास्त दाबून टाकणेसुद्धा हानिकारक आहे. जी समाजव्यवस्था माणसाला संन्यास, ब्रह्मचर्य व साधुत्वाकडे नेऊ इच्छिते, ती निसर्गाशी टक्कर घेत आहे आणि निसर्ग आपल्या प्रतिद्वंद्वीकडून कधीही परास्त होत नाही, तर त्यास छिन्नभिन्न करून टाकते. विशुद्ध संन्यासाची कल्पना तर स्पष्ट आहे की कोणत्याही संस्कृतीची आधार बनूच शकत नाही; कारण ते तर वास्तविकत: संस्कृती व सभ्यतेच्या विरुद्ध आहे. होय, हे शक्य आहे की, संन्यासवादी कल्पना मनात वसवून समाजव्यवस्थेत एक असे वासनाशून्य वातावरण अवश्य निर्माण केले जाऊ शकते, की ज्यात, कामसंबंधांना स्वत: एक नीच, घृणित व तिरस्करणीय गोष्ट समजले जाईल. त्यापासून अलिप्त राहण्यासाठी नैतिकतेचा आदर्श मानला जाईल आणि यथाशक्ती या आकर्षणाला दाबून टाकण्याचा प्रयत्न केला जाईल. परजातीय (परलिंगाच्या) आकर्षणाला दाबून टाकणे वास्तविकत: मानवतेला ठार करणे आहे. त्यामुळे लैंगिक आकर्षणच केवळ नष्ट होणार नाही, तर ते आपल्याबरोबर माणसाची बुद्धिमत्ता, कार्यशक्ती, मानसिक क्षमता, निश्चय व संकल्प आणि साहस व धैर्याला नष्ट करील. हे आकर्षण गेल्यावर माणसाच्या सर्व शक्ती गारठून जातील, त्याचे रक्त थंड पडेल. त्यात उत्थानक्षमता राहणार नाही; कारण हीच मनुष्याची महानतम प्रेरक शक्ती आहे.

सारांश, सजातीय ओढीला या पराकाष्ठेपासून वाचवून मध्यम मार्गावर आणणे आणि तिला एका योग्य नियमावलीने बांधणे एका शुद्ध संस्कृतीचे प्रथम कर्तव्य आहे. सामाजिक जीवनाची व्यवस्था अशी हवी की, तिने एकीकडे असामान्य संवेदना आणि प्रेरणेच्या त्या सर्व साधनांना मज्जाव करावा, ज्यांना मनुष्य स्वत: आपल्या इच्छेने व आपल्या कामवासनेने निर्माण करतो आणि दुसरीकडे सामान्य संवेदनांच्या तृप्तीसाठी असा मार्ग खुला करावा जो खुद्द निसर्गाच्या उद्देशानुरुप आहे.

# कुटुंबाचा पाया

आता हा प्रश्न पडतो की, निसर्गाचा उद्देश काय आहे? या बाबतीत आम्हाला पूर्णपणे अंधारात ठेवले गेले आहे काय की डोळे झाकून आम्ही ज्या कोणत्या वस्तूवर हात ठेवू तीच निसर्गाचा उद्देश बनावी? अथवा निसर्ग नियमावर मनन व चिंतन करून आम्ही निसर्गाच्या आशयाप्रत पोहचावे? कदाचित बहुतेक लोक पहिल्या स्थितीलाच मान्य करतात आणि म्हणूनच ते नैसर्गिक नियमांवर दृष्टी न टाकताच हव्या त्या गोष्टीला निसर्गाचा आशय म्हणतात. जेव्हा एखादा संशोधक तथ्याच्या शोधात निघतो तेव्हा थोडेच लांब गेल्यावर त्याला असे कळते की जणू निसर्ग स्वत:च आपल्या उद्दिष्टाकडे अंगुलीनिर्देश करीत आहे.

हे तर कळले की, सर्व प्राण्यांप्रमाणे मनुष्यालासुद्धा जोडी अर्थात दोन सजातीत उत्पन्न केले आहे आणि त्यांच्यात सजातीय आकर्षण उत्पन्न करण्यात निसर्गाचे प्रथम ध्येय जातिजीवन अस्तित्वात ठेवणे आहे. मनुष्यापासून निसर्गाची केवळ इतकीच अपेक्षा नाही, तर तो मनुष्यापासून यापेक्षा अधिक काही अपेक्षा करतो. थोडे लक्ष दिल्यास आम्हाला कळेल की, त्या अपेक्षा काय आहेत व कोणत्या प्रकारच्या आहेत?

सर्वप्रथम ज्या गोष्टीवर आमची दृष्टी पडते ती अशी आहे की, सर्व प्राण्यांच्या उलट मनुष्याचे अपत्य पालनपोषणासाठी अत्याधिक वेळ सेवा व सावधगिरीची अपेक्षा करते. जर त्याला केवळ एक प्राणीमात्रच मानले तरीसुद्धा आम्हाला आढळते की, आपल्या गरजा पूर्ण करण्यासाठी अर्थात भोजन करणे व आपल्या अस्तित्वाला टिकवून धरण्यासाठी योग्य बनण्याकरिता त्याला अनेक वर्षांचा कालावधी लागतो. सुरूवातीच्या दोन-तीन वर्षांपर्यंत तर ते अपत्य इतके असहाय्य असते की आईच्या निरंतर संरक्षणाशिवाय ते जिवंतदेखील राहू शकत नाही.

परंतु हे स्पष्ट आहे की, मनुष्य मग तो सभ्यतेच्या अतिप्रारंभिक युगातील का असेना, कोणत्याही स्थितीत निव्वळ पशू नाही. कोणत्या न कोणत्या युगात सभ्यता त्याच्या जीवनासाठी आवश्यक आहे आणि या सभ्यतेमुळे संततीच्या स्वाभाविक गरजांबरोबर अनिवार्यत: दोन अन्य गरजा जुडतात. एक असे की, मुलाच्या पालनपोषणात त्या सर्व सांस्कृतिक साधनांचा उपयोग केला जावा जी त्याच्या पालकाला प्राप्त होऊ शकतात. दुसरे असे की, मुलाला अशा प्रकारे प्रशिक्षित केले जावे की, ज्या सामाजिक वातावरणात ते जन्मले आहे तेथे समाजाचा कारखाना

चालविण्यासाठी आणि गत कार्यकर्त्यांचे स्थान घेण्यासाठी त्याने तयार व्हावे.

मग संस्कृती जितकी अधिक उन्नतीशील आणि उच्चश्रेणीची होत जाते तितक्या या दोन्ही गरजासुद्धा अधिक भारी आणि वजनी होत जातात. एकीकडे संततीच्या पालनपोषणासाठी आवश्यक साधने आणि उपकरणे वाढत जातात. दुसरीकडे संस्कृती स्वत: जिवंत राहण्यासाठी केवळ आपल्या स्तरानुसार चांगले शिक्षित कार्यकर्ते मागत नाही, तर आपल्या विकास व उन्नतीसाठी अशीसुद्धा मागणी करते की, प्रत्येक पिढी पहिल्या पिढीपेक्षा अधिक चांगली व्हावी, अर्थात अन्य शब्दांत प्रत्येक मुलाला त्याच्या संरक्षकाने स्वत:पेक्षा अधिक चांगला बनविण्याचा प्रयत्न करावा चरमसीमेला पोचलेला त्याग, जो मनुष्याकडून अहंकाराच्या बलिदानाचीसुद्धा अपेक्षा करतो.

या आहेत मानवी स्वभावाच्या मागण्या आणि या मागण्यांचे प्रथम लक्ष्य आहेत स्त्रिया. पुरुष क्षणभर स्त्रीशी मिलन करून तिच्यापासून व त्या मिलनाच्या जबाबदारीपासून दूर होऊ शकतो; परंतु स्त्रीलाच या मिलनाचे फळ वर्षानुवर्षे नव्हे तर आयुष्यभर गुरफटून ठेवते. गर्भवती झाल्यापासून कमीतकमी पाच वर्षे हे फळ तिचा पाठपुरावा सोडीत नाही. संस्कृतीच्या सर्व मागण्या पूर्ण करावयाच्या असतील तर त्याचा अर्थ असा आहे की, आणखी पंधरा वर्षांपर्यंत त्या स्त्रीने, जिने एक क्षणभर पुरुषासमवेत संभोगाचा आनंद लुटला होता, त्याच्या जबाबदारीचे ओझे वाहत राहावे. प्रश्न असा आहे की, एका संयुक्त क्रियेची जबाबदारी पेलण्यासाठी एक व्यक्ती कशी तयार होऊ शकते? जोपर्यंत स्त्रीला आपल्या सहकाऱ्याच्या विश्वासघाताच्या भयापासून मुक्ती प्राप्त होत नाही, जोपर्यंत तिला आपल्या बाळाच्या पालनपोषणासंबंधी पूर्ण समाधान होत नाही, जोपर्यंत तिला स्वत:ला आपल्या जीवनासंबंधी गरजांच्या पूर्ततेपासून विशिष्ट मर्यादेपर्यंत मुक्त केले जात नाही; तोपर्यंत ती इतके जास्त ओझे उचलण्यास कशी तयार होईल? ज्या स्त्रीचा कोणीही संरक्षक नसेल, तिच्यासाठी गर्भ निश्चितच एक दुर्घटना, एक संकट; एवढेच नव्हे तर एक भयंकर विपत्ती आहे ज्यातून मुक्ती प्राप्त करण्याची इच्छा तिच्यात स्वाभाविक रूपाने उत्पन्न होईल. ती याचे स्वागत कशी करू शकते?

निश्चितपणे हे आवश्यक आहे जर मानवजातीचे अस्तित्व टिकून राहणे आणि संस्कृती व सभ्यतेची स्थापना व विकास आवश्यक असेल की, जो पुरुष ज्या स्त्रीला गर्भवती करील, त्यानेच ते ओझे सांभाळण्यात तिला सहयोग द्यावा. पण या सहयोगासाठी त्याला कसे तयार केले जावे? तो तर स्वभावत: स्वार्थी जन्मलेला आहे. जेथपावेतो मानवजातीच्या अस्तित्वाला टिकवून ठेवण्याच्या नैसर्गिक कर्तव्याचा संबंध

आहे, त्याच्या वाटणीचे काम तर त्याच क्षणी पूर्ण होते जेव्हा तो स्त्रीला गर्भवती बनवितो. मग तो भार केवळ स्त्रीशीच संबंधित राहतो व पुरुषाशी त्याचा काडीमात्र संबंध उरत नाही. जेथपर्यंत स्त्रीजातीच्या आकर्षणाचा प्रश्न आहे, तोसुद्धा त्याला त्याच स्त्रीशी संबंध ठेवण्यास भाग पाडीत नाही. त्याने इच्छिले तर तो तिला सोडून दुसरीशी व दुसरीला सोडून तिसरीशी संबंध जोडू शकतो व प्रत्येक जमिनीत बीज फेकत जाऊ शकतो. म्हणून जर ही गोष्ट फक्त त्याच्या इच्छेवर सोडून दिली गेली, तर कोणतेही कारण नाही की त्याने आनंदाने हा भार उचलण्यास तयार व्हावे. मग कोणती शक्ती त्याला आपल्या श्रमाचे फळ त्या स्त्री व त्या मुलासाठी खर्च करण्यास भाग पाडील? त्याने दुसऱ्या एका सुंदर तरुणीला सोडून या पोट फुगलेल्या स्त्रीशी मन लाऊन का बरे राहावे? का बरे त्याने त्या हाडामांसाच्या गोळ्याचे विनाकारण आपल्या खर्चाने पालनपोषण करावे? का बरे त्याच्या रडण्याने आपली झोपमोड करावी? का बरे त्या बाळाच्या हातून आपले नुकसान करून घ्यावे, जो प्रत्येक वस्तू तोडतो, फोडतो आणि सर्व घरात घाण करीत फिरतो व कोणाचेही ऐकत नाही?

अल्लाहने एका विशिष्ट सीमेपर्यंत या समस्येच्या सोडवणुकीची व्यवस्था केली आहे. त्याने स्त्रीमध्ये सौंदर्य, चित्ताकर्षण व प्रेमासाठी त्याग करण्याची क्षमता निर्माण केली. ती या हत्याराने पुरुषाच्या स्वार्थपरायण वैयक्तिकतेवर विजय प्राप्त केले आणि त्याला आपला बंदी बनविले. त्याला बाळातसुद्धा प्रत्येकाला वश करण्याची एक विचित्र शक्ती दिली जेणेकरून आपले कष्टदायी, विध्वंसक गुण आणि खोडसाळपणा असूनसुद्धा आईवडिलांना आपल्या प्रेमपाशात तो जखडून ठेवतो. परंतु केवळ याचमुळे यांच्या दबावाने मनुष्याला आपल्या नैतिक, स्वाभाविक व सांस्कृतिक कर्तव्यांचे पालन करण्यासाठी अनेक वर्षे नुकसान, कष्ट व त्याग सहन करावा लागतो. अखेर मनुष्याबरोबर त्याचा हा आदिकालिक शत्रूसुद्धा आहे जो त्याला नैसर्गिक मार्गापासून दूर हाकण्यासाठी नेहमी प्रयत्नशील असतो. त्याच्या कपटीपणा व फसवेगिरीच्या झोळीत प्रत्येक युग व प्रत्येक जातीच्या लोकांना मार्गभ्रष्ट करण्यासाठी तऱ्हेतऱ्हेच्या युक्त्याप्रयुक्त्या व प्रलोभनांचे भांडार लपलेले आहे.

हा धर्माचा चमत्कार आहे की, तो स्त्री व पुरुष दोघांना धर्म व संस्कृतीसाठी त्याग करण्यास प्रवृत्त करतो व या स्वार्थी प्राण्याला मनुष्य बनवून प्रस्तुत करतो. ते अल्लाहने पाठविलेले प्रेषितच होते, ज्यांनी निसर्गाचा उद्देश चांगल्या प्रकारे समजून स्त्री व पुरुषादरम्यान लैंगिक व सांस्कृतिक सहयोगाच्या योग्य रूपाचा म्हणजे विवाहाचा

प्रस्ताव केला. त्यांच्याच शिकवणी व आदेशाने या जगाच्या प्रत्येक राष्ट्रात व पृथ्वीच्या प्रत्येक कोपऱ्यात विवाहाचा कायदा सुरू झाला. त्यांनीच प्रसार केलेल्या नैतिक सिद्धान्तामुळे माणसात आध्यात्मिक क्षमता निर्माण झाल्याने या सेवेतील विपत्तींना व हानीला सहन करण्याची क्षमता त्यात निर्माण होत गेली. नाहीतर वास्तविकपणे आई व वडिलापेक्षा अधिक मोठा मुलांचा कोणीही शत्रू बनला नसता. त्यांनीच स्थापित केलेल्या सामाजिकतेच्या नियमामुळे कुटुंबव्यवस्थेचा पाया घातला गेला. या व्यवस्थेचे दृढ बंधन मुली व मुलांना या जबाबदारीचे संबंध व त्या सहयोगाला भाग पाडतात; नाहीतर तारुण्याच्या पाशवी निकडींचा जोर इतका तीव्र असतो की, केवळ नैतिक जबाबदारीची भावना कोणत्याही बाह्य शिस्तीविना त्यांना मुक्त कामुकतेपासून वाचवू शकली नसती. कामवासना खुद्द सामूहिकतेची शत्रू आहे. ही स्वार्थपरायणता, वैयक्तिकता आणि अराजकतेची प्रवृत्ती असणारी भावना आहे. यात स्थिरता नाही. यात जबाबदारीची जाणीव नाही. ही फक्त क्षणिक आनंदासाठी उत्तेजित करते. या राक्षसाला वंश करून याला सामूहिक जीवनाच्या त्या जीवनाच्या जे सहिष्णुता, स्थिरता, श्रम व दायित्व आणि निरंतर सहनशीलतेची अपेक्षा करते, सेवेसाठी तयार करणे काही सोपे काम नव्हे. हा विवाहाचा कायदा आणि कुटुंबव्यवस्थाच आहे, ज्यामुळे उच्छृंखलता व अव्यवस्थेची वृत्ती माणसाकडून हिसकावून घेते आणि त्याला स्त्री-पुरुषाच्या त्या अविराम सहयोग व सहायतेचा एजंट बनविते. हे सामाजिक जीवनाच्या निर्णयासाठी आवश्यक आहे. हे नसेल तर मनुष्याचे सांस्कृतिक जीवन संपुष्टात येईल. मनुष्य पशुप्रमाणे राहू लागेल आणि सरतेशेवटी मानवजात जीवनपटलावरून नाहीशी होईल.

म्हणून (स्त्री-पुरुष) सजातीय स्वभावाला अराजकता व असंतुलनापासून रोखून त्याच्या नैसर्गिक अपेक्षांची पूर्तता व तृप्तीसाठी मार्ग खुला करावा असे निसर्ग इच्छितो. तो केवळ हाच आहे की, स्त्री व पुरुषादरम्यान विवाहाच्या माध्यमाने स्थायी संबंध असावेत आणि या संबंधाद्वारे कुटुंबव्यवस्थेचा पाया घातला जावा. संस्कृतीचा विशाल कारखाना चालविण्यासाठी ज्या सुट्या भागांची गरज आहे, ते कुटुंबाच्या या लघु-कार्यक्षेत्रांत तयार केले जातात. तेथे मुले व मुली तारुण्यात पदार्पण करतानाच या कार्यक्षेत्राच्या व्यवस्थापकांना चिंता होऊ लागते की, त्यांच्या योग्य जोड्या लावाव्यात, जेणेकरून त्यांच्या मिलनाने जास्तीतजास्त चांगली संतती निर्माण व्हावी. त्यांच्यापासून जी संतती निर्माण होते तिला या कार्यक्षेत्रातील प्रत्येक कार्यकर्ता शुद्ध मनोभावे उत्तमोत्तम

बनविण्याचा प्रयत्न करतो. पृथ्वीवर आपल्या जीवनाचा पहिला क्षण आरंभ करताच बाळाला कुटुंबात प्रेम, संरक्षण व शिक्षण-प्रशिक्षणाचे वातावरण प्राप्त होते, जे त्याच्या विकासासाठी अमृत सिद्ध होते. वास्तविकत: कुटुंबातच बाळाला केवळ प्रेमच करणारे लोक असत नाहीत. तर ते मनापासून इच्छितात की, बाळ ज्या श्रेणीत जन्मले आहे त्यापेक्षा उच्च श्रेणीत त्याने पोचावे. जगात केवळ आईवडिलांमध्येच अशी भावना जन्म घेऊ शकते की, त्यांच्या बाळाने त्यांच्यापेक्षा सुस्थितीत राहावे व त्यांच्यापेक्षा अधिक प्रगती करावी. अशा प्रकारे ते कोणत्याही निश्चयाविना, कोणतेही उत्तेजन नसता पुढील पिढीला आधुनिक पिढीपेक्षा सरस बनविण्यासाठी व मानवस्वभावाचा मार्ग सरळ करण्यासाठी प्रयत्नशील असतात. त्यांच्या या प्रयत्नांत स्वार्थाचा गंधसुद्धा नसतो. त्यांना स्वत:साठी काही नको असते. ते तर केवळ आपल्या बाळाचे कल्याण इच्छितात आणि त्याला एक सफल व उत्तम मनुष्य बनल्याचे पाहून त्यांना श्रमसाफल्याचा आनंद होतो. असे विश्वसनीय कार्यकर्ता, सेवक आणि नि:स्वार्थी लोक कुटुंबाच्या या कार्यक्षेत्राविना बाहेर कोठे मिळतील, जे मानवजातीच्या हितासाठी केवळ नि:शुल्क सेवाच करतात असे नव्हे तर आपला वेळ, आपले सुख, आपली शक्ती, आपली क्षमता, आपल्या प्रत्येक बहुमूल्य वस्तूचे बलिदान करण्यास तयार होतात. त्याचे फळ खाणारे तर दुसरेच आहेत. कुटुंबप्रमुख समजतात की, आपल्या श्रमाने दुसऱ्यासाठी त्यांनी एक उत्तम कार्यकर्ता व सेवक निर्माण केला? याच्यापेक्षा अधिक पवित्र व उच्चतर संस्था मानवजातीत एखादी दुसरी आहे काय?

प्रत्येक वर्षी मानवजातीला स्वत:च्या स्वायित्वासाठी आणि मानवसंस्कृतीला त्याच्या विकास व प्रगतीसाठी अशा लक्षावधी व कोट्यवधी जोडप्यांची गरज आहे. ज्यांनी आनंदाने स्वत:ला या सेवेसाठी व तिच्या जबाबदारीसाठी सादर करावे आणि विवाहाद्वारे त्या प्रकारच्या आणखी अधिक संस्थांचा पाया घालावा. हा वैभवशाली कारखाना जगात चालू आहे, तो असाच चालावा व वाढावा आणि अशाच प्रकारचे स्वयंसेवक सदैव सेवेसाठी येत राहावे आणि या कारखान्यासाठी कार्यकर्ते उपलब्ध करून देत रहावेत. नवीन भरती झाली नाही आणि निसर्गाच्या नियमानुसार जुने कार्यकर्ते निरुपयोगी होऊन बाजूला जात राहिले, तर काम करणारे लोक संख्येने घटत राहतील आणि एके दिवशी जीवनाची ही धावपळ समाप्त होईल. प्रत्येक व्यक्ती या संस्कृतीची मशीन चालविण्यात मग्न आहे. तिचे कर्तव्य केवळ इतकेच नव्हे की, जीवात जीव असेपर्यंत त्याने ती चालवावी तर असेही आहे की, त्याची जागा घेण्यासाठी

त्याच्यासारखेच कार्यकर्ते एकत्रित करण्याचा प्रयत्न त्याने करीत राहावे.

या दृष्टीने पाहिले तर विवाहाचे महत्त्व केवळ इतकेच नाही की, ते सजातीय भावनापूर्ण करण्याचे एकच वैध रूप आहे, तर वास्तविकत: हे एक सामूहिक कर्तव्य आहे. हा व्यक्तीवर समूहाचा स्वाभाविक अधिकार आहे. व्यक्तीला हा अधिकार कदापि नाही की, विवाह करणे अथवा न करण्याचा निर्णय स्वत:कडे सुरक्षित ठेवावा. जे लोक एखाद्या योग्य कारणाशिवाय विवाहाला नकार देतात, ते समूहातील केवळ निरुपयोगी व्यक्तीच नव्हे तर समाजद्रोही व लुटारू आहेत. प्रत्येक व्यक्ती जी पृथ्वीवर जन्म घेते तिने जीवनात पहिला श्वास घेतल्यापासून तारुण्यात पदार्पण करण्यापर्यंत निसर्गाच्या अपार संपत्तीचा लाभ घेतलेला आहे. मागील पिढ्यांनी एकत्र केलेली संपत्ती, त्यांनी स्थापन केलेल्या संस्थामुळेच तिला जिवंत राहाणे, वाढणे व मानवतेला विकसित करण्याची संधी प्राप्त झाली. समाजाने या आशेवर त्याच्या अपूर्व शक्तींना पूर्णत्वाला पोचविण्यासाठी आपली संपत्ती व शक्ती कामी लावली की, जेव्हा तो मनुष्य स्वत: काही देण्यास योग्य बनेल, तेव्हा तो देईल. मग तो मोठा झाल्यावर स्वत:साठी व्यक्तिगत स्वातंत्र्य व स्वाधीनतेची मागणी करू लागतो आणि म्हणतो की, ''मी फक्त आपल्या इच्छा पूर्ण करीन.'' पण त्या जबाबदाऱ्या व कर्तव्यांचा भार उचलण्यास तयार नाही. खरे पाहता तो मनुष्य समाजाशी अशा स्थितीत द्रोह व धोकेबाजी करीत आहे. त्याच्या जीवनाचा प्रत्येक क्षण जुलूम व अन्याय आहे. समाज सचेत असेल तर तो या अपराध्याला जन्टलमन अथवा ऑनरेबल, मॅडम किंवा महात्मा समजण्याऐवजी त्या दृष्टीने पाहील ज्याने तो चोर, डाकू व कपटी लोकांना पाहतो. आम्ही इच्छिले असो अथवा नसो, कोणत्याही परिस्थितीत आम्ही त्या वारसासंपत्तीचे उत्तराधिकारी बनलो आहोत, जी आमच्या पूर्वीच्या पिढ्यांनी मागे ठेवली आहे. आता आम्ही या निर्णयासाठी कसे स्वतंत्र बनू शकतो की, ज्या निसर्ग नियमानुसार ही वडिलोपार्जीत संपत्ती आम्हापर्यंत पोचली आहे, तिचा उद्देश पूर्ण करावा की करू नये. असला वंश तयार करावा की करू नये, जो मानवजातीच्या या वारशाचा व संपत्तीचा वारस बनेल. ती सांभाळण्यासाठी असे अन्य लोक तयार करावेत अथवा करू नयेत जसे आम्ही स्वत: तयार केलो गेलो आहोत.

## दुराचाराला आळा

विवाह व कुटुंबाचा पाया घालण्याबरोबरच हेसुद्धा आवश्यक आहे की विवाहाच्या चार भिंतीबाहेर कामवासना तृप्तीचे द्वार कठोरपणे बंद केले जावे; कारण याशिवाय निसर्गाचे ते ध्येय पूर्ण होऊ शकत नाही, जे विवाह व कुटुंबाचा पाया घालण्याची मागणी करीत आहे.

पुरातन अज्ञानाप्रमाणे नवीन अज्ञानाच्या युगातसुद्धा बहुतेक लोक परस्त्रीगमनाला एक नैसर्गिक प्रक्रिया मानतात आणि विवाह त्यांच्या दृष्टीने केवळ संस्कृतीने वाढलेल्या अथवा अनावश्यक गोष्टींपैकी एक गोष्ट आहे. त्यांचा विचार असा आहे की, निसर्गाने ज्याप्रमाणे प्रत्येक शेळीला प्रत्येक बोकडासाठी व प्रत्येक कुत्रीला प्रत्येक कुत्र्यासाठी जन्मास घातले आहे. त्याप्रमाणे प्रत्येक स्त्रीलासुद्धा प्रत्येक पुरुषासाठी जन्म दिला आहे. नैसर्गिक पद्धतसुद्धा अशीच आहे की, जेव्हा इच्छा होईल, जेव्हा संधी मिळेल आणि जेव्हा दोन व्यक्ती सहमत होतील, तेव्हा त्यांच्यात तशीच वासनापूर्ती व्हावी जशी पशुंमध्ये होते. हे तर मानवस्वभावाच्या अगदी विपरित केले आहे. त्या लोकांनी माणसाला तर पशूच समजले आहे. म्हणून जेव्हा केव्हा हे 'स्वभाव' या शब्दाचा प्रयोग करतात, तेव्हा त्यांचे तात्पर्य 'पाशवी स्वभाव' असतो, मानवी स्वभाव नव्हे. ज्या अव्यवस्थित सजातीय संबंधांना हे नैसर्गिक म्हणतात, तो पशूसाठी निश्चितच नैसर्गिक आहे; परंतु माणसासाठी कदापि नैसर्गिक असू शकत नाही. हे केवळ मानवस्वभावाच्या प्रतिकूल आहे, असे नव्हे तर आपल्या अंतिम परिणामानुसार त्या पाशवी स्वभावाच्यासुद्धा प्रतिकूल आहे, जो मनुष्यात आहे. ते अशासाठी की मनुष्यात मानवता व पशुता वेगवेगळ्या वस्तू नाहीत. वास्तविकत: एका अस्तित्वात दोघे मिळून एकच व्यक्तित्व बनते. दोघांच्या गरजा आपसात एकदुसऱ्याशी अशा प्रकारे संलग्न होतात की, जर एकाच्या उद्देशाकडून तोंड फिरविले तर दुसऱ्याचा उद्देशदेखील संपुष्टात येतो.

व्यभिचारात प्रत्यक्षपणे मनुष्याला असे वाटते की, यामुळे पाशवी स्वभावाच्या गरजा पूर्ण होतात आणि वंश व जातीय स्थायित्वाचा उद्देश केवळ सजातीय प्रक्रियेने पूर्ण होतो. मग तो विवाह करून होवो की विना विवाह केल्याने होवो. परंतु यापूर्वी ज काही आम्ही सांगितले आहे, त्यावर पुन्हा एकदा दृष्टी टाका. आपणास कळेल की, ही प्रक्रिया ज्याप्रकारे मानवस्वभावाच्या ध्येयाला हानी पोचविते, त्याच प्रकारे पाशवी स्वभावाच्या ध्येयालासुद्धा हानी पोचविते. मानव स्वभावाची अपेक्षा आहे की, सजातीय

(स्त्री-पुरुष) संबंधात स्थायित्व व दृढता असावी, जेणेकरून मुलाला माता आणि पिता दोघांनी मिळून सांभाळावे आणि दीर्घ काळापर्यंत पतीने केवळ मुलाचाच नव्हे तर मुलाच्या आईचासुद्धा भार उचलावा. जर पतीला विश्वास नसेल की, हे मूल त्याचेच आहे तर तो त्याच्या पालनपोषणासाठी त्याग व कष्ट सहन करणार नाही आणि त्याला हे आवडणार नाही की, त्याच्या संपत्तीचा मालक ते मूल व्हावे. तसेच जर स्त्रीला विश्वास नसेल की, जो तिला गर्भवती बनवीत आहे तो तिची व मुलाची जबाबदारी उचलण्यास तयार नाही तर ती गर्भावस्थेचा त्रास सहन करण्यास मुळीच तयार होणार नाही. मुलाच्या पालनपोषणात आई व वडिलांनी सहयोग दिला नाही, तर त्याचे शिक्षण-प्रशिक्षण आणि त्याची नैतिक, मानसिक व आर्थिक स्थिती कदापि त्या स्तरापर्यंत पोचू शकणार नाही, ज्यामुळे तो मानवसंस्कृतीसाठी लाभदायक कार्य करणारा बनावा. या मानवस्वभावाच्या गरजा आहेत. जेव्हा या गरजांकडून तोंड फिरवून स्त्री-पुरुष पशूप्रमाणे अस्थायी संबंध स्थापित करतात, तेव्हा खुद्द पाशवी स्वभावाच्या गरजांपासून (अर्थात संतानोत्पत्ती) सुद्धा तोंड फिरवतात; कारण त्या वेळी संतानोत्पत्ती त्यांचा उद्देश नसतो व असू शकत नाही. त्या वेळी त्यांच्यामधील सजातीय संबंध केवळ वासनातृप्ती व केवळ मनोरंजन आणि आमोद-प्रमोदासाठी असते, जे मुळातच निसर्गाच्या उद्देशाविरुद्ध आहे.

वर्तमान अज्ञानांच्या ध्वजवाहकांना स्वत:लासुद्धा ही बाजू सबळ वाटत नाही, म्हणून याला आणखी एक तर्क जोडतात. ते म्हणतात की, समाजातील दोन व्यक्तींनी एकत्र काही तास मनोरंजन व आमोद-प्रमोदात घालविले, तर त्यात समाजाचे काय बिघडते की, त्याने यात हस्तक्षेप करावा? समाजाला अशा स्थितीत हस्तक्षेप करण्याचा अवश्य अधिकार आहे जेव्हा एका सजातीने (पुरुष अथवा स्त्री) दुसऱ्यावर अत्याचार करावा अथवा फसवेगिरी, कपटीपणा व लबाडी करावी किंवा एखाद्या सामाजिक विद्रोहाला कारणीभूत व्हावे. परंतु जेथे यापैकी कोणतीही गोष्ट नसेल आणि दोन व्यक्तींदरम्यान आनंदप्राप्तीचीच बाब असेल, तर समाजाला त्यांच्यात विघ्न आणण्याचा काय अधिकार आहे? लोकांच्या असल्या खाजगी बाबतीत नाक खुपसल्यास वैयक्तिक स्वातंत्र्य निरर्थक शब्द बनून राहील.

व्यक्तिस्वातंत्र्याची ही कल्पना अठराव्या व एकोणिसाव्या शतकातील अज्ञानापैकी देन आहे, ज्यांचा अंधार ज्ञान-विज्ञानाचे प्रथम किरण येताच नाहीसा होतो.

थोडासा विचार केल्यास कळते की, ज्या स्वातंत्र्याची मागणी व्यक्तीसाठी केली जात आहे, त्याला सामाजिक जीवनात अजिबात वाव नाही. ज्याला अशा स्वातंत्र्याची अपेक्षा असेल त्याला जंगलात जाऊन पशूप्रमाणे राहावे लागेल. मानवसमाज तर वास्तविकत: मिलाप व संगठनाच्या अशा जाळ्याचे नाव आहे ज्यात प्रत्येक व्यक्तीचे जीवन अन्य असंख्य व्यक्तींशी जुडलेले आहे. त्यांना प्रभावित करते, त्यांच्याकडून प्रभावित होते. या पारस्परिक संबंधात मनुष्याच्या कोणत्याही प्रक्रियेला एकमात्र वैयक्तिक व पूर्णपणे व्यक्तिगत म्हटले जाऊ शकत नाही. अशा एखाद्या वैयक्तिक प्रक्रियेबद्दल कल्पनासुद्धा केली जाऊ शकत नाही जिचा प्रभाव सामूहिक रूपाने पूर्ण समाजावर पडत नसेल. व्यक्त क्रिया तर दूरची गोष्ट झाली, मनातील अव्यक्त विचारसुद्धा असा नाही जो आमच्या अस्तित्वावर व त्यापासून प्रतिबिंबित होऊन दुसऱ्यावर परिणाम करीत नसेल. आमच्या हृदय व देहाच्या प्रत्येक हालचालीचे फळ आमच्यापासून निघून इतक्या लांबपर्यंत पोचतात की, आमचे ज्ञान कोणत्याही प्रकारे त्यांना आपल्या कक्षेत आणू शकत नाही. अशा स्थितीत हे कसे म्हणता येईल की, एका व्यक्तीने आपली शक्ती वापरल्यास तिच्याशिवाय अन्य कोणावर त्याचा परिणाम होत नाही, म्हणून याच्याशी कोणाचाही संबंध नाही आणि तिला आपल्या बाबतीत पूर्ण स्वातंत्र्य मिळणे आवश्यक आहे. मला हे स्वातंत्र्य दिले जाऊ शकत नाही की, हातात काठी घेऊन हवे तेथे फिरवावी, आपल्या पायांचा उपयोग करून मी हवे तिथे घुसावे. आपल्या गाडीला हवी तशी चालवावी व आपल्या घरात इच्छा होईल तितकी घाण जमा करावी. या व अशा प्रकारच्या अगणित गोष्टी सामाजिक बंधनांचे पालन करण्यास मला भाग पाडतात. तर मग माझ्या वासनाच केवळ या 'सन्मानाचा' अधिकार कशा प्राप्त करू शकतात की, त्यांना कोणत्याही सामाजिक नियमांचे पालन करण्याची चाड नसावी? आणि मला संपूर्ण स्वातंत्र्य दिले जावे की मी त्यांचा हवा तसा उपयोग करावा?

एक पुरुष व एक स्त्री एकत्र येऊन एखाद्या गुप्त स्थानी सर्वांपासून दूर जो आनंद घेतात, त्याचा सामाजिक जीवनावर काहीही परिणाम होत नाही असे म्हणणे निव्वळ बालिशपणाची गोष्ट होय. खरे पाहता याचा परिणाम केवळ त्या समाजावरच होत नाही, तर संपूर्ण मानवजातीवर होतो. याशिवाय याचे प्रभाव केवळ वर्तमान काळापर्यंतच सीमित राहात नाहीत, तर येणाऱ्या पिढ्यांनासुद्धा याचे परिणाम भोगावे लागतात. ज्या सामूहिक आणि सामाजिक संबंधाने संपूर्ण मानवता बांधली गेली आहे, त्यापासून

कोणतीही व्यक्ती कोणत्याही परिस्थितीत मुक्त नाही. बंदिस्त खोल्यांत आणि चार भिंतीच्या आडोशातसुद्धा त्याच प्रकारे सामूहिक जीवनाशी त्याची बांधीलकी आहे, जशी बाजारात अथवा सभेत असते. ज्यावेळी तो गुप्तपणे संततीला जन्म देण्याची आपली शक्ती क्षणिक व निष्फळ आमोद-प्रमोदासाठी नष्ट करतो, तेव्हा वास्तविकत: तो सामाजिक जीवनात अव्यवस्था पसरविण्यात, मानवजातीबद्दल अन्याय करण्यात व समाजाला अगणित नैतिक, भौतिक व सांस्कृतिक हानी पोचविण्यात मग्न असतो. तो आपल्या स्वार्थपरायणतेने त्या सर्व सामाजिक संस्थांना आघात पोचवितो, ज्यांचा त्याने समाजातील एक व्यक्ती म्हणून लाभ तर घेतला; परंतु त्या टिकवून ठेवण्याची जी जबाबदारी त्याच्यावर होती ती पूर्ण करण्यास त्याने नकार दिला. समाजाने म्युनिसिपालिटीपासून राज्यापर्यंत, शाळेपासून सैन्यापर्यंत, कारखान्यापासून वैज्ञानिक शोधाच्या संस्थापर्यंत जितक्या संस्था स्थापित करून ठेवल्या आहेत, त्या सर्व या विश्वासावर स्थापित केल्या आहेत की तो प्रत्येक मनुष्य जो त्यांचा लाभ घेत आला आहे, तो त्या टिकवून ठेवण्यासाठी आपली जबाबदारी पूर्ण करील; परंतु जर त्या कृतघ्न माणसाने आपल्या कामवासनेचा अशा प्रकारे दुरुपयोग केला की, ज्यात संतानोत्पादन आणि संतती प्रशिक्षणाची कोणतीही इच्छाच नव्हती, तर त्याने एकाच आघातात आपल्यापुरते त्या संपूर्ण व्यवस्थेचे मूळ कापून टाकले. त्याने त्या सामाजिक वचनाचा भंग केला, ज्यात तो एक मनुष्य म्हणून सामील होता. त्याने आपल्या डोक्यावरील ओझे स्वत: उचलण्याऐवजी दुसऱ्यावर लादण्याचा प्रयत्न केला. त्याला काही सज्जन पुरुष म्हणता येणार नाही. तर तो एक चोर, विश्वासघातकी व लुटारू आहे. त्याच्याशी सद्व्यवहार करणे म्हणजे संपूर्ण मानवजातीवर अन्याय करणे होय.

सामाजिक जीवनात व्यक्तीचे स्थान काय आहे, हे चांगल्या प्रकारे समजून घेतल्यास यात कोणतीही शंका उरत नाही की, ज्या शक्ती आमच्या आत्मा व शरीरात भरलेल्या आहेत, त्या केवळ आमच्यासाठीच नव्हे तर संपूर्ण मानवतेसाठी आमच्यापाशी ठेव आहेत आणि आम्ही त्यांच्यापैकी प्रत्येकाबद्दल संपूर्ण मानवतेस जबाबदार आहोत. आम्ही स्वत: आपल्या जिवाला अथवा आपल्या शक्तींपैकी एखाद्या शक्तीला नष्ट केले अथवा आपल्या अनुचित कर्माने स्वत:ला नुकसान पोहचविले; तर आमचे हे कृत्य असे नव्हे की, जे काही आमच्याजवळ आहे ते आम्ही नष्ट केले अथवा त्याला नुकसान पोचविले. वास्तविकत: हे कसे आहे की, संपूर्ण मानवजगतासाठी जी ठेव आमच्यापाशी

होती त्यात आम्ही विश्वासघात केला. आपल्या या कृत्याने संपूर्ण मानवजातीला हानी पोहचविली. आमचे जगातील अस्तित्व खुद्द या गोष्टीची साक्ष आहे की, इतरांनी जबाबदाऱ्या व संकटांचे ओझे उचलून जीवनज्योत आमच्याकडे स्थानांतरित केली, तेव्हाच आम्ही या जगात येऊ शकलो. याशिवाय राज्य शासनाने आमच्या प्राणांचे रक्षण केले. आरोग्य खाते आमच्या जिवाच्या रक्षणात मग्न राहिले. लक्षावधी व कोट्यवधी लोकांनी मिळून आमच्या शक्ती वाढविणे व सुधारण्याचा प्रयत्न केला आणि आम्हाला ते बनविले जे आम्ही आहोत. त्या सर्वांचा हा योग्य मोबदला होऊ शकेल का? हे न्याय्य ठरेल का की, त्या आत्मा व शक्तीच्या अस्तित्वात, स्थायित्वात व विकासात दुसऱ्यांचा इतका मोठा वाटा आहे, त्याला आम्ही नष्ट करावे अथवा लाभदायी बनविण्याऐवजी हानिकारक बनवावे? याच कारणास्तव आत्महत्या निषिद्ध ठरविली गेली आहे. म्हणूनच हस्तमैथून करणाऱ्याला सर्वांत मोठ्या विद्वानाने अभिशापित म्हटले आहे. समलिंगी (म्हणजे पुरुषाचे पुरुषाशी व स्त्रीचे स्त्रीशी) संभोगाला याच आधारे निकृष्टतम अपराध घोषित केले आहे आणि याच कारणामुळे व्यभिचारसुद्धा वैयक्तिक मनोरंजन अथवा आमोद-प्रमोद नव्हे, तर संपूर्ण मानवसमाजावर अत्याचार आहे.

व्यभिचार अनेक सामूहिक अत्याचारांची जननी आहे, हे आपण पाहू या-

१) सर्वप्रथम व्यभिचारी व्यक्ती स्वत:ला संक्रमक रोगांच्या संकटात अडकविते आणि अशा प्रकारे केवळ आपल्या शारीरिक शक्तीचा जो समाजाला उपयोग होतो, त्यात अडचण निर्माण करते. यामुळे स्वत:ला व संततीलासुद्धा हानी पोहचविते. परमा (प्रमेह) संबंधी प्रत्येक डॉक्टर आपणास सांगेल की, मूत्र-स्थानी होणारी ही जखम क्वचितच पूर्णपणे भरून येते. एका मोठ्या डॉक्टराचे कथन आहे- ''एकदा झालेला परमा रोग कायमचा बनतो. त्यामुळे यकृत, मूत्राशय, अंडकोषासारखे अवयव कधी कधी आघातग्रस्त होतात. सांधेदुखी व अन्य रोगांचेसुद्धा हे कारण बनते. यामुळे कायमस्वरूपी वांझोटेपणासुद्धा येण्याची शक्यता असते आणि हा रोग संक्रामकसुद्धा असतो. उरला उपदंश रोग तर कोणालाही माहीत नाही की त्याने संपूर्ण शरीरव्यवस्था विषाक्त होते. डोक्यापासून पायापर्यंत शरीराचा कोणताही अवयव असा नाही ज्यात त्याचे विष पोचत नसेल. तो खुद्द रोग्याच्या शारीरिक शक्तींनाच केवळ नष्ट करीत नाही, तर एका व्यक्तीपासून किती व्यक्तींपर्यंत विभिन्न साधनांनी पोचतो, याची

कल्पना केली जाऊ शकत नाही. याशिवाय याच्यामुळे रोग्याची मुले व मुलांची मुलेसुद्धा काही अपराध नसता या शिक्षेचे भागीदार बनतात. मुले आंधळी, बहिरी, मुक्ती होणे मनोविनोदाच्या त्या काही क्षणांचे फळ होय. या मुलांना त्या अत्याचारी पित्याने आपल्या जीवनाची प्रिय संपत्ती मानले होते.

२) संक्रामक रोगात प्रत्येक व्यभिचारी अडकेल असे नाही. परंतु त्या नैतिक दूषणापासून वाचणे शक्य नाही. ज्याचा संबंध अनिवार्यपणे याच्याशी आहे. निर्लज्जपणा, धूर्तपणा, फसवेगिरी, खोटेपणा, वाईट हेतू, स्वार्थीपणा, वासनांची गुलामी, कामुकता व कुटिलपणा; हे सर्व व्यभिचाराचे ते दुष्परिणाम होत जे खुद्द व्यभिचारी व्यक्तीच्या अंतरात्म्यावर होतात. ज्या व्यक्तीत हे दुर्गुण असतात, तिच्या दोषांचा परिणाम केवळ जातीय व्यवहारापर्यंतच मर्यादित राहत नाही तर जीवनाच्या प्रत्येक भागात त्याच्याकडून हीच भेट समाजाला मिळते. समाजातील अधिक लोकांत हे दुर्गुण वाढत राहिले तर त्यांच्यामुळे कला व साहित्य, मनोरंजन व क्रीडा, ज्ञान व विज्ञान, कला व कौशल्य, समाज व अर्थव्यवस्था, नीती व न्याय, सामरिक सेना व राज्यव्यवस्था; थोडक्यात असे की प्रत्येक विभाग कमीअधिक प्रमाणात प्रभावित झाल्याशिवाय राहणार नाही. विशेषत: लोकशाही व्यवस्थेत तर व्यक्तीच्या प्रत्येक नैतिक वैशिष्ट्यांचा संपूर्ण राष्ट्रावर परिणाम होणे निश्चित आहे. ज्या राष्ट्राच्या अधिक व्यक्तींच्या स्वभावात कोणतेही स्थायित्व व स्थैर्य नसेल आणि ज्या राष्ट्राच्या अधिकांश लोकांत श्रद्धा, त्याग व मनोकामनावर नियंत्रण ठेवण्याचे गुण नसतील तर त्या राष्ट्राच्या राजकारणात कोठून दृढता येणार?

३) व्यभिचाराला कायदेशीर मानल्यास हे आवश्यक बनते की, समाजात व्यभिचाराचे चलन राहावे. जी व्यक्ती असे म्हणते की नवयुवकाला भोगविलासाचा अधिकार आहे. त्याचबरोबर जणू ती असे प्रतिपादन करते की सामाजिक जीवनात एक मोठा वर्ग अशा स्त्रियांचा नेहमीच राहावा ज्यांनी सर्वप्रकारे घोर अधमता व नीच स्थितीत राहावे. मग अखेर या स्त्रिया येतील तरी कोठून? याच समाजातूनच तर जन्मतील, कोणत्याही परिस्थितीत ती कोणाची न् कोणाची तरी बहीण अथवा मुलगी असेल. त्या लक्षावधी स्त्रिया, ज्या कोणत्या न् कोणत्या घराच्या स्वामिनी, कुटुंबाच्या संस्थापिका, अनेक

बालक-बालिकांच्या पोषणकर्त्या बनल्या असत्या, त्यांनाच तर बाजारात आणून बसवावे लागेल, जेणेकरून नगरपालिकेच्या स्वच्छतागृहाप्रमाणे त्यांनी उडाणटप्पू कामुक तरुणांच्या वासनापूर्तीचे साधन बनावे, त्यांच्याकडून सतीत्वाच्या सर्व उत्तम वैशिष्ठ्यांना हिरावून घेतले जावे, त्यांना क्रय-विक्रयासाठी प्रशिक्षित केले जावे; आपले प्रेम, आपले हृदय, आपले शरीर, आपले सौंदर्य व आपल्या छटांना प्रत्येक क्षणी नवनवीन गिऱ्हाईकांच्या हाती विकण्यासाठी त्यांना तयार केले जावे. त्यांनी कोणतीही फलदायी व लाभकारक सेवा करण्याऐवजी आयुष्यभर दुसऱ्यांच्या वासनांचे बाहुले बनून राहावे.

४) व्यभिचाराच्या औचित्यामुळे विवाहाच्या सांस्कृतिक प्रतिबंधाला निश्चितच आघात पोचतो, इतकेच नव्हे तर परिणामत: विवाह संपुष्टात येऊन केवळ व्यभिचारच शिल्लक उरतो. व्यभिचारी प्रवृत्ती असणाऱ्या स्त्री-पुरुषात ही क्षमता क्वचितच उरते की शुद्ध दाम्पत्य जीवन त्यांनी घालवावे. जी दुर्भावना, दुराशय, आमोद-प्रमोद व उच्छृंखलता अशा प्रकारे उत्पन्न होते आणि अशा लोकांत भवनांचे जे अस्थैर्य व वासनांवर नियंत्रण न ठेवण्याच्या जो दोष विकास पावतो, तो त्या वैशिष्ट्यांसाठी घातक विष आहे. जी एका सफल वैवाहिक जीवनासाठी आवश्यक आहेत. ते जरी वैवाहिक जीवनाच्या बंधनात गेले तरी त्यांच्या दरम्यान तो सद्व्यवहार, संयोग व तो आपापसांतील विश्वास व दया-कृपेचे संबंध कदापि दृढ होत नाहीत, ज्यायोगे उत्तम संतती जन्म घेते व एका 'हर्षमय गृहाचा' अविर्भाव होतो. याशिवाय जेथे व्यभिचाराची सवलत असेल तेथे व्यावहारिक रूपाने हे अशक्य आहे की विवाहाची समाजपोषक परंपरा शिल्लक राहावी; कारण ज्या लोकांना जबाबदारीचे ओझे उचलल्याविना वासनातृप्तीची संधी असेल त्यांना काय गरज पडली आहे की, त्यांनी विवाह करून आपल्या डोक्यावर जबाबदाऱ्यांचे नसते ओझे लादून घ्यावे?

५) व्यभिचार योग्य ठरविल्यामुळे केवळ संस्कृतीचीच पाळेमुळे खणली जातात से नव्हे तर खुद्द मानवजातीचे समूळ विनाश होतो. या अगोदरच सिद्ध केले गेले आहे की, निर्विघ्न लैंगिक संबंधात पुरुष व स्त्री या दोघांपैकी कोणाचीही ही इच्छा नसते की त्यांनी मानवजातीच्या स्थायित्वाची सेवा पूर्ण करावी.

६) व्यभिचारामुळे जरी जात व समाजाला मुले प्राप्त होतात, तरी ती अवैध मुले असतात. वंशात वैध व अवैधमधील फरक एक भावनेचा प्रश्न नव्हे, जसे काही अज्ञानी लोक समजतात. वास्तविकत: अनेक दृष्टीने अवैध मुलाला जन्म देणे खुद्द मुलावर व संपूर्ण मानवसंस्कृतीवर एक घोर अत्याचार होय. प्रथम तर अशा मुलाचे वीर्य अशा स्थितीत धारण होते जेव्हा आई व वडील दोघांवर विशुद्ध पाश्विक भावनांचे आधिपत्य असते. एका विवाहित जोडप्यात संभोगाच्या वेळी ज्या पवित्र मानवी भावना असतात, त्या अवैध संबंध ठेवणाऱ्या जोडप्याला कधीच प्राप्त होऊ शकणार नाहीत. त्यांना तर एकमात्र पाशविकतेचा उन्माद एक-दुसऱ्याजवळ आणतो आणि त्या वेळी संपूर्ण मानवी वैशिष्ट्यांचा बहिष्कार होतो. म्हणून एक अवैध मुलाला स्वभावात: आपल्या आईवडिलांच्या पाशविकतेचाच वारसा प्राप्त होतो. अशा मुलाचे स्वागत करण्यास आईसुद्धा तयार नसते व वडीलही तयार नसतात. हे मूल एका आकस्मिक घटनेच्या परिणास्वरूप आईवडिलांच्या दरम्यान आलेले असते. त्याला पित्याचे प्रेम व त्याची साधने सामान्यत: प्राप्त नसतात. केवळ मातेकडून एकांगी प्रशिक्षण प्राप्त होते. आणि तेसुद्धा खिन्न व अप्रसन्न मन:स्थितीत प्राप्त होते. त्याला आजोबा, आजी, आईचे आई-वडील, चुलते, मामा व इतर कुटुंबीयांचे संरक्षण नसते. ते कोणत्याही परिस्थितीत एक अपूर्ण व सदोष मनुष्य म्हणूनच वाढतो. त्याचे आचरण शुद्ध बनणार नाही की त्याच्या क्षमताही उजळणार नाहीत आणि त्याला उन्नती व विकासाची सर्व साधनेसुद्धा प्राप्त होऊ शकणार नाहीत. ते मूल स्वत: अपूर्ण, लाचार, निष्क्रिय व शापित असेल आणि संस्कृतीसाठी ते कोणत्याही प्रकारे तितके लाभकारी सिद्ध होणार नाही, जितके ते वैध असता लाभप्रद झाले असते.

निर्विघ्न व्यभिचाराचे समर्थक म्हणतात की, मुलांची निगा राखण्यासाठी व शिक्षण-प्रशिक्षणासाठी एक राष्ट्रीय व्यवस्था असली पाहिजे, जेणेकरून मुलांना त्यांच्या आईवडिलांनी आपल्या निर्विघ्न संबंधाने जन्म द्यावा आणि राष्ट्राने त्यांचे पालनपोषण करून संस्कृतीच्या सेवेसाठी तयार करावे. या प्रस्तावापासून त्या लोकांचा उद्देश असा आहे की, स्त्री व पुरुषांचे स्वातंत्र्य व त्यांची वैयक्तिकता सुरक्षित राहावी. त्यांच्या वासनांना विवाहाच्या बेड्यांत जखडल्याशिवाय

संतानोत्पादन व बालशिक्षणाचा उद्देश प्राप्त केला जावा. हे आश्चर्यकारक आहे की ज्या लोकांना आधुनिक पिढीचे व्यक्तित्व इतके प्रिय आहे, ते भावी पिढीसाठी राष्ट्रीय शिक्षण अथवा सरकारी प्रशिक्षणाच्या अशा पद्धतीचा प्रस्ताव करतात, ज्यात वैयक्तिकतेच्या विकास व व्यक्तित्वाच्या प्रगतीला कोणताच वाव नाही. अशा प्रकारच्या पद्धतीत जेथे हजारो-लाखो मुले एकाच वेळी एक नकाशा, एक साचा व एकाच पद्धतीने तयार केले गेले तर मुलांचे व्यक्तित्वाचा उत्थान होणार नाही आणि ते उजळू शकणार नाहीत. तेथे तर जास्तीत जास्त एकांगी व कृत्रिम समानता निर्माण होईल. या कारखान्यातून मुले त्याचप्रमाणे एकसारखे व्यक्तित्व प्राप्त करतील, ज्याप्रमाणे एखाद्या मोठ्या फॅक्टरीमधून एकसमान लोखंडी सुटे भाग निघतात. विचार करा की मानवासंबंधी या निर्बुद्ध लोकांची कल्पना किती तुच्छ व हीन दर्जाची आहे. हे बाटा कंपनीच्या बुटाप्रमाणे माणसाची निर्मिती करू इच्छितात. यांना कल्पना नाही की मुलांच्या व्यक्तित्वाची रचना एक महान ललित कला आहे. ही कला एका अशाच लहानशा चित्रगृहात पूर्ण होऊ शकते जेथे प्रत्येक चित्रकाराचे लक्ष प्रत्येक चित्रावर केंद्रित असते. एखाद्या मोठ्या फॅक्टरीत जेथे पगारी मजूर एकाच प्रकारचे चित्र लाखोंच्या संख्येत तयार करीत असतील, तेथे ही कला नष्ट होईल व उन्नती होणार नाही. राष्ट्रीय शिक्षणाच्या या पद्धतीत आपणास अनिवार्यत: अशा कार्यकर्त्यांची गरज भासेल, जे समाजातर्फे मुलांच्या पालनपोषणाचे कार्य करतील. हे कार्य पूर्ण करण्यासाठी अनिवार्यत: कार्यकर्ते लागतील जे आपल्या इच्छा व भावनावर नियंत्रण ठेवतील व ते नीतिमान व संयमी असतील. तरच ते मुलांत नीतिमत्ता व संयम उत्पन्न करू शकतील? आता प्रश्न हा आहे की, आपण असले मनुष्य बळ कोठून आणणार? अशा प्रकारे जेव्हा आपल्या समाजातून नैतिकता, संयम व इच्छा नियंत्रित करण्याचे बीजच जर नष्ट केले गेले तर आंधळ्यांच्या वस्तीत डोळस लोक कोठून सापडतील? की त्यांनी नव्या पिढीला डोळसपणे चालण्यास शिकवावे?

७) व्यभिचाराद्वारे एक स्वार्थी पुरुष ज्या स्त्रीला मुलाची आई बनवितो, तिचे जीवन कायमस्वरूपी भ्रष्ट होते. तिच्यावर तिरस्कार, जननिंदा आणि संकटांचा डोंगर अशा प्रकारे कोसळतो की, जिवंत असेपर्यंत ती त्या ओझ्याखालून निसटू शकत

नाही. नवीन नैतिक सिद्धान्तांनी या अडचणीची सोडवणूक अशी काढली आहे की प्रत्येक प्रकारच्या मातृत्वाला समान दर्जा देण्यात यावा मग तो विवाहाच्या बंधनात बांधून असो की त्यापासून मुक्त राहून असो. असे म्हटले जाते की प्रत्येक स्थितीत मातृत्वाचे कर्तव्य अदा करण्याजोगे आहे आणि असे की, ज्या मुलीने आपल्या भोळेपणामुळे अथवा असावधानीमुळे आई बनण्याची जबाबदारी स्वीकारली, तिच्यावर हा अन्याय आहे की, समाजात तिची निंदा केली जावी. त्यात व्यभिचारिणी स्त्रीसाठी कितीही सवलत असली तरी समाजासाठी सामूहिकपणे सर्वथा संकटच संकट आहे. स्वभावात: समाज अवैध मुलाच्या मातेला घृणा व तिरस्काराच्या दृष्टीने पाहातो. एकीकडे व्यक्तीला पाप व व्यभिचारापासून दूर ठेवण्यासाठी हे उपकारक आहे तर दुसरीकडे खुद्द समाजातसुद्धा नैतिक भावना जागृत असल्याचे हे चिन्ह आहे. अवैध मुलाची आई व वैध मुलाच्या आईला समान मानले जाऊ लागले तर याचा अर्थ असा होईल की, समाजातून सत्य-असत्य, चांगले आणि वाईट पाप-पुण्यातील फरकाचे उच्चाटन झाले आहे. असे मानल्यामुळे त्या अडचणी व कष्ट दूर होतील ज्यांना अवैध मुलाच्या मातेला तोंड द्यावे लागते? तुम्ही आपल्या दृष्टिकोनाने अवैध वैध दोन्ही प्रकारच्या मातृत्वाला समान लेखू शकता; परंतु निसर्ग या दोघांना समान मानीत नाही आणि दोघी वास्तवत: समान होऊ शकतच नाहीत. त्यांची समानता बुद्धी, तर्क, न्याय, तथ्य वगैरे प्रत्येक गोष्टीच्या विरुद्ध आहे. त्या विवेकशून्य स्त्रीने वासनांच्या सामायिक प्रेरणेने वशीभूत होऊन स्वत:ला एका परपुरुषाच्या हवाली केले जो तिचे व तिच्या बालकाचे पालनपोषण करण्यास तयार नव्हता. अशी स्त्री त्या शहाण्या स्त्रीसमान कशी असेल, जिने आपल्या भावनांना तोपर्यंत नियंत्रणात ठेवले जोपर्यंत तिला एक सज्जन व कर्तव्यपरायण पुरुष मिळत नाही. कोणता शहाणा या दोघींना समान म्हणू शकेल? हवे तर तुम्ही दाखविण्यासाठी त्या दोघींना समान म्हणून शकता. परंतु तुम्ही त्या निर्बुद्ध स्त्रीला ते पालनपोषण व संरक्षण, तो प्रेमळ हार्दिक सहवास, ती प्रेमयुक्त देखरेख आणि ते शांती व संतोषपूर्ण जीवन कोठून द्याल जे केवळ एका पतिव्रता स्त्रीला उपलब्ध आहे? तुम्ही तिच्या मुलासाठी वडिलाचे प्रेम व संपूर्ण पितृकुळाची दया व कृपा कोणत्या बाजारातून आणाल? जास्तीतजास्त

तुम्ही कायद्याच्या बडग्याने त्याला भाकर-वस्त्र देऊ शकाल; परंतु एखाद्या मातेला आणि एखाद्या मुलाला जगात केवळ भाकरी व वस्त्राचीच गरज असते का? म्हणून हे एक सत्य आहे की अवैध व वैध मातृत्वाला समान दर्जा दिल्याने पाप करणाऱ्या स्त्रीला कितीही बाह्य सांत्वना मिळाली तरी ही कृती त्यांना त्यांच्या मूर्खपणाच्या नैसर्गिक परिणामापासून व त्यांच्या मुलांना अशा प्रकारच्या जन्माने होणाऱ्या हानीपासून वाचवू शकत नाही.

सामाजिक जीवनाची स्थापना व योग्य विकासासाठी महत्त्वपूर्ण आहे की, समाजात लैंगिक प्रक्रियेच्या अव्यवस्थेला कठोरपणे प्रतिबंध केला जावा आणि वासनांच्या तृप्तीसाठी फक्त एकच द्वार - दांपत्याचे द्वार खुले ठेवले जावे. लोकांना व्यभिचारांचे स्वातंत्र्य देणे म्हणजे त्यांना केवळ अयोग्य सवलतच देणे नसून समाजावर अत्याचार करणे होय. एवढेच नव्हे तर ती समाजाची हत्या होय. जो समाज व्यभिचाराला फक्त व्यक्तींचा 'प्रसन्न काळ' समजून डोळेझाक करतो आणि 'अनिर्बंध बीजारोपणाबद्दल' औदार्य दाखविण्यास तयार आहे, तो खरे पाहता एक मूर्ख समाज आहे. त्याला आपल्या अधिकाराची जाणीव नाही. तो स्वत:शी शत्रुत्व करीत आहे त्याला आपल्या अधिकारांची जाणीव असेल आणि त्याने समजून घेतले की, लैंगिक संबंधाच्या बाबतीत व्यक्तीस्वातंत्र्याचा प्रभाव सामाजिक हित व कल्याणावर काय होतो, तर त्याने याकडे त्याच दृष्टीने पाहावे, ज्या दृष्टीने तो चोरी, डाका व हत्येला पाहातो. इतकेच नव्हे तर हे चोरीपेक्षाही अधिक महत्त्वाचे आहे. चोर, डाकू व हत्या करणारे जास्तीत जास्त एक व्यक्ती अथवा काही व्यक्तींना हानि पोचवितात; परंतु व्यभिचारी संपूर्ण समाजावर व त्याच्या आगामी पिढ्यांवर दरोडा घालतो. तो एकाच वेळी लक्षावधी व कोट्यवधी लोकांची चोरी करतो, त्याच्या अपराधाचा परिणाम त्या सर्व अपराधांपेक्षा अधिक दूरगामी व विस्तृत आहे. जेव्हा हे मान्य केले की, व्यक्तींच्या स्वार्थी हस्तक्षेपांच्या विरुद्ध समाजाच्या मदतीसाठी कायद्याची शक्ती आवश्यक आहे आणि जेव्हा याच आधारे चोरी, खून, लुटालूट, धूर्तपणा व स्वत्वहरणाच्या अन्य प्रकारांना अपराध समजून कायद्याच्या बळावर प्रतिबंध केला जातो, तर काही कारण नाही की व्यभिचाराच्या बाबतीत कायद्याने समाजाचे संरक्षक बनू नये व कायदेशीर अपराध मानला जाऊ नये.

सैद्धान्तिक रूपानेसुद्धा हे उघड आहे की, विवाह व व्यभिचार दोन्ही एकच वेळी एखाद्या सामाजिक व्यवस्थेचे अंग बनू शकत नाहीत. एका व्यक्तीसाठी जबाबदारी

उचलल्याविना वासनांच्या पूर्ततेला कायदेशीर मानले गेले तर याच कामासाठी विवाहाचा कायदा बनविणे केवळ निरर्थक गोष्ट आहे. हे अगदी असे आहे जसे रेल्वेने विनातिकीट प्रवास करणे वैध मानले जावे आणि त्याचबरोबर प्रवासासाठी तिकीट घेण्याचा नियमसुद्धा बनवावा. कोणताही मनुष्य या दोन्ही पद्धतींचा एकाच वेळी स्वीकार करू शकत नाही. योग्य पद्धत तर तीच आहे की एक तर तिकीट काढण्याचा नियम रद्द केला जावा अथवा जर नियम ठेवावयाचाच असेल तर विनातिकीट प्रवास करणे गुन्हा ठरविला जावा. अशा तऱ्हेनेच विवाह व व्यभिचाराच्या बाबतीत दोन्ही प्रकार अवलंबिणे निश्चितच अनुचित आहे. संस्कृतीसाठी विवाहाचे बंधन आवश्यक आहे, जसे यापूर्वी पुराव्यानिशी सिद्ध केले गेले आहे, तर त्याचबरोबर हेसुद्धा आवश्यक आहे की व्यभिचाराला गुन्हा घोषित केले जावे.[१]

अज्ञानपणाच्या लक्षणापैकी एक स्पष्ट लक्षण असेही आहे की, ज्यांचे परिणाम सीमित असतात आणि ज्यांचा लवकरच अनुभव येऊ लागतो त्यांना तर डोळ्यांसमोर ठेवले जाते; परंतु ज्यांचे परिणाम विस्तृत व दूरगामी असल्यामुळे अव्यक्त असतात व उशीरा नजरेसमोर येतात, त्यांना काहीही महत्त्व दिले जात नाही. एवढेच नव्हे तर ते विचारणीय आहेत असेदेखील समजले जात नाही. चोरी, खून आणि दरोड्यासारख्या बाबींना महत्त्वपूर्ण व व्यभिचाराला महत्त्वहीन मानण्याचे हेच कारण होय. जो मनुष्य

---

१. एक सामान्य भ्रम असा आहे की, विवाहाअगोदर युवकाला वासनांची पूर्तता करण्यासाठी थोडीफार संधी मिळणे आवश्यक आहे. कारण तारुण्यातील भावनांची गर्दी रोखणे कठीण असते आणि जर त्यावर बंधन घातले गेले तर आरोग्याला हानी पोचेल; परंतु या परिणामाचा पायाच मुळी चुकीचा आहे. भावनांची अशी गर्दी जिला बंधन घालणे शक्य नाही. एक असामान्य स्थिती आहे आणि सामान्य लोकांत अशी स्थिती उत्पन्न होण्याचे कारण असे आहे की, एक चुकीची संस्कृतीव्यवस्था त्यांना असे करण्यास उद्दीपित करते. आमचे चित्रपट, आमचे साहित्य, आमचे चित्र, आमचे संगीत आणि या मिश्र समाजात नटूनथटून वावरणाऱ्या स्त्रियांचे प्रत्येक ठिकाणी पुरुषांशी मिळणे-मिसळणे वगैर अशी साधने आहेत, जी नकळत सामान्य माणसांना वासनांच्या बाबतीत असामान्य बनवितात. एका शांततापूर्ण वातावरणात पुरुष-स्त्रियांमधील अशा गोंधळाला सामोरे जाण्याची कधीच पाळी आली नसती की मानसिक व नैतिक प्रशिक्षणाने त्यावर बंधन घालता येऊ नये. असा विचार की तारुण्यात लैंगिक प्रक्रिया न झाल्याने आरोग्याला हानी होते. म्हणून आरोग्य टिकविण्यासाठी परस्त्रीगमन केले पाहिजे हे भ्रमाव्यतिरिक्त काहीही नाही. वास्तविकत: आरोग्य व नैतिकता या दोघांच्या संरक्षणासाठी हे आवश्यक आहे की, सामाजिकतेची ती अशुद्ध व्यवस्था व समृद्ध जीवनाच्या अशुद्ध मापदंडाला बदलेले जावे ज्यामुळे आज विवाह कठीण व व्यभिचार सोपे बनलेले आहे.

आपल्या घरात प्लेगचे उंदीर जमा करतो अथवा कॉलरा पसरवितो, अज्ञानी संस्कृती याला तर क्षमायोग्य मानीत नाही; कारण त्याचे हे कृत्य स्पष्टपणे हानिकारक दिसते. जो व्यभिचारी आपल्या स्वार्थीपणाने संस्कृतीला समूळ नष्ट करतो. त्याच्यामुळे होणाऱ्या विनाशाची अनुभूती होत नाही. म्हणून ते बुद्धिसंगत वाटते तो मनुष्य अज्ञानी लोकांच्या प्रत्येक सवलतीसाठी पात्र वाटतो. इतकचे नव्हे तर त्यांच्या हे लक्षात येतच नाही की या कृतीत विनाशाचे स्वरुप कोणते आहे. संस्कृतीचा पाया अज्ञानाऐवजी विवेक व निसर्गज्ञानावर आधारित असेल तर ही कार्यपद्धती कदापि अवलंबिली जाणार नाही.

## व्यभिचाराला आळा

संस्कृतीला हानिकारक कृत्यांना आळा घालण्यासाठी केवळ कायद्याने अपराध मानणे पुरेशे नाही. तर त्यासाठी शिक्षा निश्चित केली जाऊन त्याबरोबरच चार प्रकारचे अन्य उपायसुद्धा करणे आवश्यक आहे.

(१) शिक्षण-प्रशिक्षणांने लोकांची मानसिकता सुधारावी आणि त्यांच्या अंतरंगात येथपर्यंत सुधारणा केली जावी की त्यांना स्वत:लाच या कृत्याची घृणा यावी. त्यांनी याला पाप समजावे आणि त्यांच्या स्वत:च्या नैतिक आंतरिक प्रेरणेने त्यांना या कृत्यांत अडकण्यापासून परावृत्त करावे.

(२) सामूहिक आचरण व जनमत या पाप अथवा दुष्ट त्याच्या विरोधात येथपर्यंत तयार केले जावे की, जनसामान्यांनी याला दोष व लज्जास्पद कृत्य समजावे. या पापी कृत्यात अडकणाऱ्यास तिरस्काराच्या दृष्टीने लोकांनी पाहावे जेणेकरून ज्या व्यक्तींचे शिक्षण-प्रशिक्षण अपूर्ण राहिले असेल त्यांना जनमताच्या शक्तीने अपराध करण्यास प्रतिबंध करावा.

(३) संस्कृती-व्यवस्थेत त्या सर्व साधनांना मनाई केली जावी जे त्या अपराधाला प्रोत्साहित करणारे व त्याकडे प्रेरित करणारे व त्याचे प्रलोभन दाखविणारे आहेत. त्याचबरोबर शक्यतो ती साधनेदेखील नष्ट केली जावीत जी लोकांना हे कृत्य करण्यास भाग पाडतात.

(४) सांस्कृतिक जीवनात अशा अडचणी निर्माण केल्या जाव्यात की, जर एखाद्याने हा अपराध करण्याचे ठरविले तरी त्याला ते सहज साध्य होऊ नये.

हे चार उपाय असे आहेत जे बरोबर व आवश्यक असल्याबद्दल बुद्धी ग्वाही देते. निसर्ग त्यांची मागणी करते आणि व्यावहारिकदृष्ट्या संपूर्ण जगाचा व्यवहारसुद्धा असाच आहे की, समाजाचा कायदा ज्या ज्या गोष्टींना अपराध मानतो, त्या सर्वांना आळा घालण्यासाठी कायद्याव्यतिरिक्त हे चारी उपाय कमीजास्त प्रमाणात अवलंबिले जातात. आता जेव्हा हे मान्य केले गेले की, अवैध लैंगिकसंबंधांचा प्रसार संस्कृतीसाठी घातक आहे आणि समाजाच्या दृष्टीने तो एक भीषण अपराध आहे तर निश्चितपणे हेदेखील मान्य करावे लागेल की त्यावर बंधन घालण्यासाठी कायद्याबरोबरच ते सर्व सुधारणा करणारे व त्यास आळा घालणारे उपाय अवलंबिले पाहिजेत. त्यांचा उल्लेख

वर आला आहे. यासाठी लोकांचे प्रशिक्षण झाले पाहिजे. याच्या विरोधात जनमत तयार केले पाहिजे. सामाजिक (संस्कृती) क्षेत्रातून त्या सर्व गोष्टींना हद्दपार केले पाहिजे. त्या अडचणींनासुद्धा दूर केले पाहिजे ज्या विवाह करण्यात येतात. पुरुष व स्त्रियांच्या संबंधावर अशी बंधने लादली जावीत की, जर त्यांनी विवाहाबाह्य संबंध जोडण्याचा प्रयत्न केला तर त्यांच्या मार्गात अडचणीचा डोंगर उभा राहावा. व्यभिचार अपराध व पाप असल्याचे मान्य केल्यानंतर कोणताही शहाणा मनुष्य या उपयांच्या विरोधात एक शब्दसुद्धा बोलू शकणार नाही.

काही लोक ते सर्व नैतिक व सामाजिक सिद्धान्त मान्य करतात, ज्यांच्या आधारे व्यभिचाराला पाप मानले गेले आहे. परंतु त्यांचा अवलंब करण्याऐवजी फक्त सुधारणांच्या उपायावर भरोसा केला पाहिजे. ते म्हणतात की शिक्षण-प्रशिक्षणाने लोकांच्या आंतरिक भावना, त्यांच्या अंत:करणाच्या आवाजात इतकी शक्ती व त्यांच्या नैतिक प्रेरणेत इतके बळ निर्माण करा की त्यांनी स्वत: या पापापासून परावृत्त होऊन अलिप्त राहावे, नाहीतर मनाच्या सुधारणेऐवजी कायदा व प्रतिबंधात्मक उपायांचा अवलंब करण्याचा अर्थ असा होईल की तुम्ही मनुष्याशी बालकाप्रमाणे व्यवहार करता, एवढेच नव्हे तर मानवतेचा अपमान करता.

आम्हीसुद्धा त्यांचे कथन येथपावेतो मान्य करतो की मानवाच्या सुधारणेची उत्तम व श्रेष्ठ पद्धत तीच आहे जी ते सांगतात. सभ्यतेचा उत्कर्ष वास्तविकत: हाच आहे की लोकांच्या हृदयांत अशी शक्ती निर्माण केली जावी की, ज्यामुळे ते सर्व जण स्वत:च कायद्याचा मान राखू लागावेत व त्यांच्या अंत:करणाने स्वत:च त्यांना नैतिक बंधनाविरुद्ध चालण्यास प्रतिबंध करावे. या ध्येयप्राप्तीसाठी लोकांच्या शिक्षण-प्रशिक्षणावर सर्व भर दिला जातो. परंतु प्रत्यक्षपणे सभ्यता या उद्दिष्ट उत्कर्षापर्यंत पोहचली आहे का? खरे पाहता शिक्षण व नैतिक प्रशिक्षणाच्या साधनांनी समाजातील लोकांना इतके सभ्य बनविले आहे का की त्यांच्या अंत:करणावर पुरेपूर विश्वास केला जावा व सामूहिक व्यवस्थेच्या संरक्षणासाठी बाहेरील जगात कोणत्याही प्रतिबंधनात्मक पद्धती व कायद्याची गरज भासू नये? जुन्या काळाची गोष्ट सोडा, जो तुमच्या म्हणण्याप्रमाणे 'आंधळे युग' होता. हे विसावे शतक, हे 'प्रकाशमान युग' आपल्या डोळ्यांसमोर आहे. या युगातील युरोप व अमेरिकेसारख्या सभ्यतम देशांना पाहा. ज्यातील प्रत्येक मनुष्य सुशिक्षित आहे. ज्यांना आपल्या नागरिकांच्या उच्च प्रशिक्षणावर

गर्व आहे. काय तेथील शिक्षणाने व अंत:करणाच्या सुधारणेने तेथील अपराध व अवज्ञेला आळा घातला आहे? काय तेथे चोरी होत नाही? दरोडे घातले जात नाहीत? फसवेगिरी, अन्याय व अव्यवस्थेच्या घटना घडत नाहीत? काय तेथे पोलीस, न्यायालय, तुरुंग, देखरेख - तपासणी, कोणत्याही गोष्टीची गरज उरली नाही? काय तेथील लोकांत नैतिक जबाबदारीची जाणीव इतकी वाढली आहे की, आता त्यांच्याशी 'मुला' समान व्यवहार केला जात नाही? जर सत्य असे नाही, जर या 'प्रकाशमान युगात'सुद्धा समाजाच्या संगठन व कायदाव्यवस्थेला फक्त लोकांच्या नैतिक अंत:प्रवृत्तीवर सोडले जाऊ शकत नाही, जर अजूनसुद्धा सर्वत्र 'मानवतेचा असा अपमान' होत आहे की, अपराधांना मज्जाव घालण्यासाठी कायदा व प्रतिबंधात्मक उपायांचा उपयोग केला जातो, तर मग काय कारण आहे की, फक्त लैंगिक संबंधाच्या बाबतीतच का हा बालकासमान व्यवहार करण्याचा आपला आग्रह आणि तोही इतका आग्रह आहे? जरा हृदय चाचपून पाहा, कोठे चोर तर लपला नाही ना?

असे म्हटले जाते की, ज्या वस्तूंना तुम्ही कामोद्दीपक समजून संस्कृतीक्षेत्रातून वेगळे करू इच्छिता, त्या तर सर्व कला व सौंदर्यप्रेमाचा जीव आहेत. त्या काढून टाकल्यास मानवजीवनातील माधुर्यस्रोतच शुष्क होईल. म्हणून तुम्हाला संस्कृतीचे रक्षण व समाजसुधारणा, जे काही करावयाचे असेल ते तुम्ही अशा प्रकारे करा की ललितकला व सौंदर्यप्रेमाला आघात पोचता कामा नये. आम्ही सुद्धा या महानुभाव मंडळींशी येथपर्यंत सहमत आहोत की कला व सौंदर्य-प्रेम खरोखरच बहुमूल्य वस्तू आहेत. ज्यांचे रक्षणच नव्हे तर उन्नती होणे आवश्यक आहे. परंतु समाजाचे जीवन व समूहाचे कल्याण या सर्वांपेक्षा अधिक बहुमूल्य आहे. त्याचा कोणतीही कला व कोणत्याही अभिरूचिसाठी त्याग केला जाऊ शकत नाही. कला व सौंदर्याला पल्लवित-पुष्पित व्हावयाचे असेल तर स्वत:साठी विकासाचा मार्ग त्याने शोधावा. ज्यात त्याचा सामूहिक जीवन व हिताशी मेळ बसावा, जो मार्ग कला व सौंदर्यप्रेमाच्या जागी विनाश आणि कल्याणाच्या जागी अव्यवस्थेकडे नेणारा असेल, त्याला समाजात कधीच पसरण्याचा वाव दिला जाऊ शकत नाही. हा काही आमचा व्यक्तिगत व स्वत:चा सिद्धान्त नव्हे, तर हीच ज्ञान व निसर्गाची मागणी आहे. संपूर्ण जगाने हे सिद्धान्त म्हणून मान्य केले आहे आणि सर्वत्र याप्रमाणेच कार्य होत आहे. जे जगात सामाजिक जीवनासाठी घातक व अशांती पसरविणारे समजले जातात, त्यांना कोठे कला व

सौंदर्यप्रेमासाठी पसंत केले जात नाही, उदाहरणार्थ, जे साहित्य अशांती व अव्यवस्था व हत्या आणि लूटमार करण्यास उत्तेजित करते, त्याला कोठेही केवळ त्याच्या साहित्यिक गुणासाठी वैध ठरविले जाऊ शकत नाही. ज्या साहित्यात प्लेग अथवा कॉलरा पसरविण्यास उत्तेजन मिळेल, त्याला कोठेही सहन केले जाऊ शकत नाही. जो चित्रपट अथवा मंच शांती भंग करण्यास अथवा विरोधी उठाव करण्यास प्रेरित करीत असेल तर जगातील कोणतेही राज्य जनतेसमोर ते आणण्याची परवानगी देणार नाही. जे चित्र अत्याचार, अशांती व अव्यवस्था भाव दर्शविणारे असतात अथवा ज्यात चरित्र व आचरणाचे हनन असते, मग ते कलेच्या पराकाष्ठेला कितीही पोहचलेले असोत, कोणताही कायदा व कोणत्याही समाजाचे अंत:करण त्यांना आदराने पाहण्यास तयार होत नाही. खिसेकापूची कला जरी एक कला आहे आणि हातसफाईची कला यापेक्षा चांगल्या प्रकारची क्वचितच इतरत्र आढळत असेल; परंतु याची वाढ कोणालाही पाहवणार नाही. बनावट नोट व चेक आणि दस्तऐवज तयार करण्यात आश्चर्यजनक प्राविण्य व कौशल्य दाखविले जाते; परंतु कोणालाही या कलेची उन्नती आवडत नाही. ठगविणे व फसविण्याच्या कलेतसुद्धा मानवी बुद्धीने किती नैपुण्य दाखविले आहे; परंतु कोणताही सभ्यतम समाज या नैपुण्याची वाहवाह करण्यास तयार नाही. म्हणून हा सिद्धान्त सर्वमान्य आहे की समाजाचे जीवन, त्याची शांती, त्याचे हित व कल्याण प्रत्येक ललितकलेपेक्षा अधिक मौल्यवान आहेत आणि कोणत्याही कलेवर त्यांना बळी चढविले जाऊ शकत नाही. ज्या गोष्टींत मतभेद आहे ती केवळ अशी आहे की एका गोष्टीला आम्ही सामाजिक जीवन व कल्याणासाठी हानिकारक समजतो आणि दुसरीला असे समजत नाही. त्यांचा दृष्टिकोन तसाच झाला जसा आमचा आहे तर त्यांनासुद्धा कला व सौंदर्य-प्रेमावर तसाच प्रतिबंध लावण्याची गरज भासेल जशी आम्हाला भासते.

असे ही म्हटले जाते की, अवैध लैंगिक संबंधांना आळा घालण्यासाठी स्त्रिया व पुरुषादरम्यान आडपडदा घालणे वास्तविकत: त्यांच्या चरित्र व आचरणावर हल्ला आहे. यावरून असे कळते की, जणू सर्व लोकांना दुराचारी समजले गेले आहे आणि याशिवाय असे की, असले बंधन घालणाऱ्यांना आपल्या बायकांवर विश्वास नाही की पुरुषावरसुद्धा नाही. फार चांगली गोष्ट आहे; परंतु या तर्काला थोडे पुढे वाढवू. दारावर लावलेले प्रत्येक कुलूप जणू अशी घोषणा करते की त्याचा मालक सर्व जगाला चोर समजतो. प्रत्येक पोलिसाचे अस्तित्व या गोष्टीचे प्रमाण आहे की, सरकार आपल्या

प्रजेला गुंड समजते. प्रत्येक देवाणघेवाणीमध्ये जो दस्तऐवज लिहिला जातो तो या गोष्टीचे प्रमाण आहे की एक पक्ष दुसऱ्या पक्षाला कपटी व फसवणूक करणारा मानतो. प्रत्येक प्रतिबंधात्मक उपाय जो अपराध रोखण्यासाठी स्वीकारावा लागतो, त्याच्या अस्तित्वाचा अर्थ असा आहे की त्या सर्व लोकांना काल्पनिक अपराधी मानले गेले आहे, ज्यांच्यावर या उपायाचा प्रभाव पडतो. या तर्कानुसार तर आपण क्षणोक्षणी चोर, बदमाश, कपटी व संशयास्पद आचरणाचे व्यक्ती समजले जातो. परंतु आपल्या स्वाभिमानाला तिळमात्र आघात पोचत नाही तर मग काय कारण आहे की, याच एका बाबतीत आपली चेतना इतकी कोमल व भावुक बनली आहे?

खरी गोष्ट तर हीच आहे ज्याकडे आम्ही वर संकेत केला आहे. ज्या लोकांच्या डोक्यात प्राचीन नैतिक कल्पनांचा उरलासुरला प्रभाव अद्याप आहे ते व्यभिचार व लैंगिक संबंधाविषयक कायद्याच्या शिथिलतेला वाईट तर मानतात; परंतु इतके वाईट मानीत नाहीत की, त्यांना त्यावर पूर्ण प्रतिबंध घालण्याची गरज भासावी. म्हणूनच सुधारणा व प्रतिबंधात्मक उपायांच्या बाबतीत आमच्या व त्यांच्या दृष्टिकोनात भिन्नता आहे. जर निसर्गाचे सत्य त्यांच्यावर अधिक स्पष्ट झाले व या बाबीचे सत्य रूप समजले तर त्यांना या बाबतीत आमच्याशी सहमत व्हावे लागेल की, मनुष्य ज्याअर्थी मनुष्य आहे आणि त्याच्यात जोपर्यंत पाशवी गुण अस्तित्वात आहेत तोपर्यंत कोणतीही असली संस्कृती जिला लोकांची इच्छा व त्यांच्या आनंद व आवडीपेक्षा सामूहिक जीवनाचे कल्याण अधिक प्रिय असेल ती या उपायापासून गाफील राहू शकत नाही.

# दांपत्य जीवनाचे शुद्ध रूप

परिवाराचा पाया घालणे व लैंगिक अव्यवस्थेला आळा घातल्यावर एका सभ्य संस्कृतीसाठी आवश्यक आहे की, समाजव्यवस्थेत पुरुष व स्त्रीच्या संबंधांचे योग्य स्वरूप निश्चित केले जावे. त्यांच्या जबाबदाऱ्या न्यायपूर्ण रीतीने त्यांच्या दरम्यान वाटल्या जाव्यात आणि कुटुंबात त्यांचे नित्यकर्म अशा प्रकारे निर्धारित केले जावेत की, संतुलन बिघडू नये. संस्कृतीच्या सर्व समस्यात ही समस्या सर्वांत जास्त गुंतागुंतीची झाली आहे. परंतु माणसाला हा गुंता सोडविण्यात बहुधा अपयशाचे तोंड पाहावे लागले आहे.

काही राष्ट्रे अशी आहेत ज्यांत स्त्रीला पुरुषावर 'सरदार' बनविले आहे. परंतु आम्हाला एकसुद्धा असे उदाहरण आढळत नाही की, अशा प्रकारच्या राष्ट्रांपैकी एखादे राष्ट्र संस्कृती व सभ्यतेच्या शिखराला पोचले असावे. कमीतकमी ऐतिहासिक ज्ञानाच्या नोंदीत तरी कोणत्याही असल्या राष्ट्राचे चिन्ह आढळत नाही, ज्याने स्त्रीला शासक बनविले व जगात सन्मान व शक्ती प्राप्त केली आहे अथवा त्याच्याकडून एखादे मोठे कार्य झाले आहे. जगातील बहुतेक राष्ट्रांनी पुरुषाला स्त्रीवर प्राधान्य दिले आहे. परंतु या प्राधान्याने बहुतेक अत्याचाराचे रूप धारण केले आहे. स्त्रीला दासी बनवून ठेवले आहे. तिला तुच्छ व हीन समजले गेले. तिचा अपमान केला गेला. तिला कोणत्याही प्रकारचे आर्थिक व सांस्कृतिक अधिकार दिले गेले नाहीत. तिला कुटुंबात एक तुच्छ सेविका व पुरुषासाठी विषयवासनाच्या पूर्तीचे साधन बनवून ठेवले गेले आणि कुटुंबाबाहेरील स्त्रियांच्या एका वर्गाला विशिष्ट सीमेपर्यंत ज्ञान व सभ्यतेच्या अलंकारांनी सुसज्जित केले गेले तर केवळ अशासाठी की त्यांनी पुरुषांच्या वासना अत्यंत रोचक पद्धतींनी पुऱ्या कराव्यात. आपल्या संगीताने त्यांनी श्रवण-आनंद आपल्या नृत्य व कटाक्षाने दृष्टी-आनंद व आपल्या काम-चमत्काराने पुरुषांना शरीर-आनंद द्यावा. हा स्त्रीच्या अपमान व हीनतेचा सर्वांत अधिक लज्जास्पद पक्ष आहे, ज्याला पुरुषाच्या वासनेने जन्म दिला आहे आणि ज्या राष्ट्रांनी या पद्धती अवलंबिल्या ती खुद्द हानीपासून वाचू शकली नाहीत.

आधुनिक पाश्चात्य संस्कृतीने तिसरी पद्धतसुद्धा अवलंबिली आहे. ती अशी की पुरुष व स्त्रीमध्ये समानता असावी. दोघांच्या जबाबदाऱ्या समान रूप व समान प्रकारच्या असाव्यात, दोघांनी एकाच कर्मक्षेत्रात प्रतिस्पर्धा करावी, दोघांनी स्वतःची रोजी स्वतः कमवावी, आपल्या गरजांना स्वतः जबाबदार असावे. समाजरचनेचे हे रूप

अद्याप आपल्या पूर्णत्वास पोचलेले नाही कारण पुरुषाची सरदारी व प्राधान्य स्पष्टपणे अद्याप आहे. जीवनाच्या कोणत्याही क्षेत्रात स्त्री पुरुषासमान नाही आणि तिला ते सर्व अधिकार मिळालेले नाहीत, जे पूर्ण समानता म्हणून तिला मिळणे आवश्यक आहेत. आग्रह या गोष्टीचा आहे की, तिच्याविरुद्ध कायदा व मज्जावच्या उपायावर ज्या सीमेपर्यंत समानता स्थापित केली गेली आहे तिने आतापासूनच संस्कृतीव्यवस्थेत बिघाड उत्पन्न केला आहे.

या तिन्ही प्रकारच्या संस्कृती, न्याय, समानता व संतुलनापासून रिक्त आहेत; कारण यांनी निसर्गाच्या मार्गदर्शनाला समजण्यात व त्यानुसार कार्यपद्धती काटेकोरपणे अवलंबिण्यात कसूर केली आहे. जर शुद्ध मनाने विचार केला तर कळेल की निसर्ग खुद्द या समस्यांची खरी सोडवणूक दाखवीत आहे, एवढेच नव्हे तर हीसुद्धा निसर्गाचीच प्रबळ शक्ती आहे जिच्या प्रभावाने स्त्री या सीमेपर्यंत खाली उतरली नाही. ज्या सीमेपर्यंत तिला खाली उतरविण्याचा प्रयत्न केला गेला आणि या सीमेपर्यंत वाढली नाही, ज्या सीमेपर्यंत ती पुढे जाऊ इच्छित होती अथवा पुरुषाने तिला पुढे आणण्याचा प्रयत्न केला होता. या दोन्ही सीमा माणसाने अशुद्ध व बहकलेल्या विचारांच्या परिणामस्वरूप स्वीकारल्या आहेत. परंतु निसर्गाला न्याय व संतुलन हवे आणि निसर्ग त्याचे रूप ठरवितो.

ही गोष्ट कोणीही अस्वीकार करीत नाही की, माणूस म्हणून पुरुष व स्त्री दोन्ही समान आहेत. दोन्ही मानवजातीचे दोन समान अंग आहेत. संस्कृतीच्या निर्मिती व सभ्यतेचा पाया घालण्यात व मानवतेची सेवा करण्यात दोघे समान रूपाने सामील आहेत. हृदय, डोके, भावना, इच्छा व मानवी गरजा दोघांच्या ठायी आहेत. संस्कृतीच्या कल्याण व हितासाठी दोघांची मानसिक शुद्धता, बौद्धिक प्रशिक्षण, विकास व उन्नती समान रूपाने आवश्यक आहे, जेणेकरून संस्कृतीच्या सेवेत प्रत्येकाने आपापला पुरा वाटा उचलावा. या अर्थाने समानतेची मागणी अगदी रास्त आहे आणि प्रत्येक सभ्य संस्कृतीचे हे कर्तव्य आहे की पुरुषाप्रमाणेच स्त्रियांनासुद्धा आपल्या निसर्गदत्त योग्यता व क्षमतेनुसार जास्तीत जास्त प्रगती करण्याची संधी प्रदान करावी. त्यांना ज्ञान व उच्च शिक्षणाने विभूषित करावे. त्यांनासुद्धा पुरुषाप्रमाणे सांस्कृतिक व आर्थिक अधिकार प्रदान करावेत. त्यांना समाजात आदर व सन्मानाचे स्थान द्यावे जेणेकरून त्यांच्यात स्वाभिमानाची भावना जागृत व्हावी. त्यांच्यात ते श्रेष्ठतम मानवी गुण उत्पन्न व्हावेत जे

केवळ स्वाभिमानाच्या भावनेनेच उत्पन्न होऊ शकतात. ज्या राष्ट्रांनी अशी समानता नाकारली आहे, ज्यांनी आपल्या स्त्रियांना अज्ञानी, अशिक्षित, शोषित व नागरिकतेच्या अधिकारापासून वंचित ठेवले आहे, ते स्वत: पतनाच्या गर्तेत पडले. मानवतेच्या पूर्ण अर्धांगाला पतित करण्याचा अर्थ खुद्द मानवतेला पतित करणे होय. पतित मातांच्या कुशीतून आदरणीय, अशिक्षित मातांच्या कुशीतून उच्च शिक्षण विभूषित व नीच विचारांच्या मातांनी पालनपोषण केल्यास उच्च विचारांचे लोक प्राप्त होणार नाहीत.

परंतु समानतेचा एक दुसरा पक्ष असा आहे की, स्त्री व पुरुषाचे कार्यक्षेत्र एकच असावे. दोघांनी एकसमान काम करावे. दोघांवर जीवनाच्या प्रत्येक जबाबदारीचा भार समान रूपाने घातला जावा आणि संस्कृती-व्यवस्थेत दोघांचा दर्जा एकसमान असावा. याच्या समर्थनात विज्ञानाचे शोध व अनुभवाने हे सिद्ध केले जाते की, स्त्री व पुरुष आपल्या शारीरिक क्षमतेत व शक्तीनुसार समान आहेत. परंतु ही गोष्ट की या दोहोत अशा प्रकारचे साम्य आढळते याचा निर्णय लावण्यासाठी पुरेशी नाही की, निसर्गाचासुद्धा उद्देश असा आहे की, दोघांकडून एकाच प्रकारचे काम घेतले जावे. असे मत बनविणे तोपर्यंत योग्य नव्हे जोपर्यंत हे सिद्ध केले जात नाही की, दोघांची शारीरिक व्यवस्थासुद्धा एकसमान आहे. निसर्गाने दोघांवर एकाच प्रकारच्या सेवेचा भारसुद्धा घातलेला आहे आणि दोघांच्या आंतरिक भावनासुद्धा एकदुसऱ्यासमान आहेत. मनुष्याने अजूनपर्यंत जितके वैज्ञानिक शोध लावले आहेत, त्यावरून या गोष्टींचे उत्तर नकारार्थी मिळते.

जीवशास्त्राच्या शोधाने सिद्ध झाले आहे की, स्त्री आपल्या बाह्येंद्रियापासून शरीरातील अणूरेणूपर्यंत प्रत्येक बाबीत पुरुषापासून भिन्न आहे. जेव्हा गर्भाशयात अर्भकाचे लैंगिक निर्माण सुरू असते त्या वेळेपासूनच पुरुष व स्त्री म्हणून दोन्ही शारीरिक रचना एक दुसऱ्यापासून पूर्णपणे भिन्न प्रकारे विकसित होत असतात. स्त्रीची संपूर्ण शारीरिक रचना अशा प्रकारे केली जाते की, ती बालकाला जन्म देण्यास व त्याचे पालनपोषण करण्यास तयार व्हावी. प्रारंभिक भृणनिर्मितीपासून तारुण्यापर्यंत तिच्या शरीराचा विकास याच क्षमतेच्या पूर्ततेसाठी होत असतो. हीच गोष्ट तिच्या आगामी जीवनाचा मार्ग निश्चित करते.

तरुण झाल्यावर मासिक पाळीचा क्रम सुरू होतो. तिच्या अभावाने तिच्या शरीरातील सर्व इंद्रियांची क्रियाशक्ती प्रभावित होते. जीव व इंद्रियशास्त्राच्या तज्ज्ञांच्या

निरीक्षणावरून असे कळते की मासिक पाळीच्या काळात स्त्रीमध्ये खालील परिवर्तन होतात.

(१) शरीरातील तापमाण टिकवून ठेवण्याची शक्ती कमी होऊ लागते. म्हणून अधिक उष्णता निघून जाते व उष्णतामान ढासळते.

(२) नाडी शिथिल पडते. रक्तभार कमी होतो. रक्तकोशांच्या संख्येत फरक पडतो.

(३) अंतरासर्गी ग्रंथी, गळ्यातील गाठी व लिम्फैटिक ग्रंथीमध्ये परिवर्तन होते.

(४) प्रोटीन मोबोलिज्ममध्ये कमतरता येते.

(५) फॉस्फेट्स व क्लोराइड कमी निघू लागतात व गॅसियस मेटाबोलिज्ममध्ये क्षीणता प्रकट होऊ लागले.

(६) पचनक्रियेत अडचण उत्पन्न होते. भोजनातील प्रोटीन अंश व शरीरातील चरबीचा भाग कमी होतो.

(७) श्वासोच्छ्वास मंद पडतो व वार्केंद्रियात विशेषत: फरक पडतो.

(८) अवयवात शिथिलता व भावनात तीक्ष्णता येते.

हे बदल आरोग्यवान स्त्रीला आजारपणाच्या इतक्या जवळ नेतात की, तेव्हा खरोखर आरोग्य व आजाराच्या मध्ये एक स्पष्ट रेषा ओढणे कठीण होते. क्वचितच १०० पैकी २३ स्त्रिया अशा आढळतात की ज्यांना विनाकष्ट व वेदना मासिक पाळी येत असावी. एकदा १०२० स्त्रियांचे निवड न करता परीक्षण केले गेले, तेव्हा ८४ टक्के स्त्रिया अशा आढळल्या ज्यांना मासिक पाळीच्या वेळी वेदना व इतर प्रकारच्या त्रासांना तोंड द्यावे लागते. डॉ. अमील नोवक जे या शास्त्राचे मोठे विशेषज्ञ आहेत ते लिहितात,

''मासिक पाळी आलेल्या स्त्रियांमध्ये सामान्यत: खालील लक्षणे आढळतात - डोकेदुखी, थकवा, अवयव अवघडणे, स्नायू निर्बल होणे, आळस येणे, मूत्राशयात अस्वच्छता, अपचन, कधी कधी मळमळणे व वांत्या होणे. अनेक स्त्रियांच्या स्तनांत बारीक वेदना होतात आणि कधी कधी त्या इतक्या वाढतात की ठणका मारू लागतात. काही स्त्रियांच्या थाईरॉइडमध्ये इतकी सूज येते की त्यामुळे घसा भारी होतो. कधी कधी दम लागतो आणि बहुतेक श्वासोच्छ्वास करणे कठीण जाते. डॉ. क्रीगर यांनी जितक्या स्त्रियांचे परीक्षण केले त्यात अर्ध्या अशा होत्या ज्यांची मासिक पाळीच्या वेळी

अपचनाची तक्रार असे आणि अंतिम काळी मलावरोध होत असे. डॉ. गिबहार्ड यांचे कथन आहे की, अशा फारच थोड्या स्त्रिया दृष्टीस पडल्या ज्यांना मासिक पाळीच्या वेळी कोणताही त्रास होत नसे. बहुतेक स्त्रिया अशा दिसल्या ज्यांना डोकेदुखी, थकवा, पोटरीच्या खाली वेदना होतात आणि भूक लागत नाही. स्वभाव चिडखोर बनतो व रडू येते. ही स्थिती पाहता असे म्हणणे योग्य आहे की मासिक पाळीच्या वेळी स्त्री वास्तविकत: आजारी असते. हा एक आजारच आहे जो तिला प्रत्येक महिन्याला येतो.''

या शारीरिक परिवर्तनाचा प्रभाव निश्चितच स्त्रीच्या मानसिक शक्तीवर व तिच्या अवयवांच्या कार्यावर पडतो. इ. सन १९०९ मध्ये डॉ. व्हॉइस केवस्की (Voicechevsky) यांनी गहन निरीक्षणानंतर असा निष्कर्ष काढला होता की, अशा वेळी स्त्रीमध्ये विचार केंद्रित करण्याची क्षमता व मानसिक परिश्रमाची शक्ती कमी होते. प्रा. ख्रिसकेवस्की (Prof. Krschiskevsky) मानसशास्त्रीय निरीक्षणानंतर या निष्कर्षाला पोहचले की अशा वेळी स्त्रीची अवयवात्मक व्यवस्था अत्यंत उत्तेजित भावनात उग्रता व विषमता उत्पन्न होते. एखादी ट्रॅम कंडक्टर असलेली स्त्री अशा वेळी चुकीचे तिकीट देईल व पैशांची मोड मोजण्यात गोंधळून जाईल. मोटर ड्रायव्हर स्त्री हळूहळू व भीत भीत गाडी चालवील व प्रत्येक वळणावर भयभीत होईल. एखादी लेडी टायपिस्ट चुकीचे टाईप करील. त्यात तिला वेळ लागेल. प्रयत्न करूनसुद्धा शब्द सुटतील. चुकीचे वाक्य बनवील. एखाद्या अक्षरावर बोट दाबू पाहील व दुसऱ्यावरच पडेल. एखाद्या बॅरिस्टर स्त्रीची तर्कशक्ती बरोबर राहणार नाही आणि आपला खटला व त्यातील मुद्दे मांडताना तिचे डोके व तिची वक्तृत्वशक्ती दोन्ही चुका करतील. स्त्री न्यायाधीशाची विवेकशक्ती व निर्णयशक्ती दोन्ही प्रभावित होतील. एक स्त्री-दंतवैद्याला आवश्यक असलेले यंत्र मुष्किलीने सापडेल. गायिका स्त्री आपला स्वर व ध्वनिगुण हरवेल. येथपावेतो की एखादा स्वर विशेषज्ञ केवळ स्वर ऐकून सांगू शकेल की, गायिकेची सध्या मासिक पाळी सुरू आहे. तात्पर्य असे की तिच्यात आळस व अव्यवस्थितपणा दिसतो. तिचे अवयव पूर्णपणे तिच्या इच्छेच्या अधीन काम करू शकत नाहीत. तिची निश्चयशक्ती व निर्णयशक्ती संपुष्टात येते. ती विवशतेने काम करील. मासिक पाळी आली असता स्त्री स्वतंत्रतेने काम करू शकत नाही आणि ती जबाबदारीचे काम करण्यालायक राहात नाही.

प्रोफेसर लोपन्स्की 'स्त्रीच्या कर्तव्याचा विकास' या आपल्या पुस्तकात लिहितात की, स्त्री मासिक पाळी आली असता स्वतंत्रपणे काम करू शकत नाही. त्या वेळी ती परिस्थितीची दासी असते आणि तिच्यात एखादे काम निश्चयपूर्वक करण्याचे सामर्थ्य उरत नाही.

एका आरोग्यवान स्त्रीमध्ये हे बदल घडून येतात व ते वाढत वाढत एखाद्या रोगाचे रूप धारण करतात. अशा अनेक घटनांची नोंद आहे की, अशा स्थितीत स्त्रीला वेड लागते. लहान लहान गोष्टीवर रागावणे, असभ्य व मूर्खपणाचे काम करणे, येथपावेतो की, आत्महत्यासुद्धा करणे असाधारण गोष्ट नाही. डॉ. क्राफ्ट एविंग लिहितात की, दैनंदिन जीवनात आम्ही पाहतो की, ज्या महिला एरवी उदार, सुसभ्य व सुशील असतात, त्यांच्या स्थितीत मासिक पाळी आल्यानंतर अकस्मात बदल दिसून येतो. ही स्थिती त्यांच्यासाठी वादळी ठरते. त्या चिडखोर, भांडखोर व कटकट करणाऱ्या बनतात. नोकर, मुले व नवरे सर्वच त्यांच्यापासून त्रस्त होतात. एवढेच नव्हे तर अनोळखी लोकांशीसुद्धा त्या दुर्व्यवहार करतात. काही अन्य विशेषज्ञ गहन अभ्यासानंतर या निष्कर्षापर्यंत पोचले आहेत की, स्त्रियांकडून बहुतेक अपराध त्यांना मासिक पाळी आल्यावर घडतात. एक सज्जन स्त्री त्या वेळी चोरी करील आणि नंतर स्वत: आपल्या या कृत्यावर लज्जित होईल. वाइनबर्ग आपल्या अनुभवाच्या आधारे लिहितो की, आत्महत्या करणाऱ्या स्त्रियांपैकी ५० टक्के अशा आढळतात ज्यांनी मासिक पाळी आली असता हे कार्य केले. या आधारे डॉ. क्राफ्ट एबिंग यांचे असे मत आहे की, वयस्क स्त्रियांवर जेव्हा एखाद्या अपराधासाठी खटला चालविला जाईल, तेव्हा न्यायालयाने याची चौकशी केली पाहिजे की, त्यांनी हा अपराध मासिक पाळी आली असता तर केला नाही ना?

स्त्रियांसाठी मासिक पाळीपेक्षा अधिक त्रासदायक काळ गर्भावस्तेचा असतो. डॉ. रीप्रीफ लिहितात की, गर्भावस्थेत नारीच्या शरीरातून कधी कधी उपवासाच्या स्थितीपेक्षा अधिक मलनिस्सारण होते. त्यावेळी नारीची शक्ती कोणत्याही प्रकारे शारीरिक व मानसिक श्रमाचा तसा भार उचलण्यास असमर्थ असते, जसा ती गर्भावस्थाव्यतिरिक्त इतर वेळी ती उचलू शकते. ज्या स्थितीतून एक स्त्री त्यावेळी जाते त्या स्थितीतून पुरुषाला अथवा गर्भकाळ सोडून इतर वेळी खुद्द स्त्रीला जावे लागले तर निश्चितपणे ती आजारी असल्याचा शिक्कामोर्तब होईल. त्यावेळी अनेक महिन्यांपर्यंत

तिची अवयवव्यवस्था जीर्ण-शीर्ण असते. तिचे मानसिक संतुलन बिघडते. ती रोग व आरोग्याच्या मध्ये लोंबकळत असते आणि एखादे क्षुल्लक कारण तिला आजारापर्यंत पोहचवू शकते. डॉ. फिशर यांचे कथन आहे की, एक आरोग्यवान स्त्रीसुद्धा गर्भावस्थेत तीक्ष्ण आंतरिक अस्वस्थतेला बळी पडते. तिच्यात वर्णांतरण उत्पन्न होते. विचार त्रस्त करतात. बुद्धी दूषित बनते. चिंतन, ध्यान चिंता व समजुतदारपणाचे सामर्थ्य कमी होते. ह्युलॉक एलियस आणि अलबर्ट मोल व काही अन्य विशेषज्ञ या गोष्टीवर सहमत आहेत की, गर्भावस्थेच्या शेवटच्या एक महिन्यात तर स्त्री शारीरिक व मानसिकदृष्ट्या कोणतेही काम करण्यास योग्य नसते.

बालकाला जन्म दिल्यानंतर अनेक रोग प्रकट होण्याची व ते वाढण्याची शक्यता असते. प्रसूतीच्या जखमा अनिष्ट परिणाम स्वीकारण्यास तत्पर असतात. गर्भावस्थापूर्वीच्या स्थितीत परत येण्यासाठी अवयवात एक प्रक्रिया सुरू होते जी संपूर्ण शरीरव्यवस्था जीर्ण-शीर्ण करून टाकते. जरी काही धोका झाला नाही, तरीसुद्धा तिला पूर्वस्थितीत येण्यास अनेक आठवडे लागतात. अशा तऱ्हेने गर्भधारणा झाल्यापासून पूर्ण एक वर्षभर स्त्री वास्तविकत: रोगी अथवा कमीतकमी अर्धरोगी असते आणि तिची कार्यक्षमता अर्धी नव्हे तर त्यापेक्षाही कमी होते.

त्यानंतर स्तनपानाचा काळ असा असतो की ज्यात वास्तविकत: ती आपल्यासाठी जिवंत राहत नाही तर त्या ठेवीसाठी जिवंत राहते जी निसर्गाने तिच्या हवाली केली आहे. तिच्या शरीराच्या तत्त्वापासून तिच्या मुलासाठी दूध बनते. जे काही ती भोजनात खाते त्यापैकी फक्त तेवढाच भाग तिला मिळतो जेवढा ती जिवंत राहण्यास आवश्यक आहे. उरलेल्या भागाचा पूर्णपणे दूध बनण्यास उपयोग होतो. यानंतर दीर्घकाळपर्यंत तिला आपले लक्ष बाळाच्या पालनपोषण, शिक्षण वगैरेवर केंद्रित करावे लागते.

आधुनिक काळात स्तनपानाच्या समस्येची सोडवणूक अशी काढली आहे की, मुलाला बाहेरील खाद्यपदार्थावर जिवंत ठेवले जावे. निसर्गाने बाळाच्या पालनपोषणाची जी सामग्री आईच्या छातीत ठेवली आहे तिचा योग्य पर्याय अन्य काही होऊ शकत नाही. म्हणून ही काही योग्य सोडवणूक नव्हे. बाळाला यापासून वंचित करणे शुद्ध जुलूम व स्वार्थाशिवाय अन्य काही नाही. सर्व विशेषज्ञ या गोष्टीशी सहमत आहेत की बाळाच्या उत्तम विकासासाठी मातेच्या दुधापेक्षा अधिक चांगले कोणतेही अन्न नाही.

अशाच प्रकारे मुलांच्या प्रशिक्षणासाठीसुद्धा नर्सिंग होम व मुलांच्या ट्रेनिंग स्कूलसारखे उपाय शोधले गेले आहेत, जेणेकरून माता आपल्या मुलाकडून निश्चित होऊन बाहेरच्या कामाला लागू शकतील. परंतु कोणत्याही नर्सिंग होम आणि ट्रेनिंग स्कूलमध्ये माता व मातृप्रेम व ज्या औदार्य आणि सहानुभूतीवर आधारित आहे ते भाड्याने पालनपोषण करणाऱ्या स्त्रियांच्या हृदयात कोठून येणार? शिशु-प्रशिक्षणाच्या या आधुनिक पद्धतींना अद्याप अजमावले गेले नाही. अद्याप त्या पिढ्या पूर्णत: वाढल्या नाहीत, ज्या शिशुपालनाच्या या नवीन कारखान्यात तयार केल्या गेल्या आहेत. अद्याप त्यांचे आचरण, त्यांचे चरित्र, त्यांच्या कृती जगासमोर आलेल्या नाहीत की जेणेकरून या प्रयोगाचे साफल्य व असफलतेवर कोणतेही मत तयार करता यावे. म्हणून या प्रयोगासंबंधी असा दावा करणे की, जगात मातेच्या कुशीचा योग्य पर्याय शोधला गेला आहे अकाली ठरेल. कमीतकमी सध्या तरी हे तथ्य आपल्या जागी दृढ आहे की, बालकाचे स्वाभाविक ट्रेनिंग हाऊस त्याच्या मातेची कुशी आहे.

शिवाय ही गोष्ट एका सामान्य बुद्धीच्या व्यक्तीच्या सुद्धा लक्षात येईल की, जरी स्त्री व पुरुष दोघांची शारीरिक व मानसिक शक्ती आणि क्षमता पूर्णपणे समान आहे, तरीसुद्धा निसर्गाने दोघावर समान रूपाने भार टाकलेला नाही. मानवजातीचे अस्तित्व टिकवून ठेवण्यासाठी बीजारोपणाव्यतिरिक्त अन्य कोणतेही काम पुरुषाकडे सोपविले गेले नाही. यानंतर तो पूर्णपणे स्वतंत्र आहे. जीवनाच्या वाटेल त्या विभागात त्याने काम करावे. या सेवेचा पूर्ण भार स्त्रीवर टाकला गेला आहे. हा भार उचलण्यासाठी तिला त्या वेळेपासून तयार केले जाते जेव्हा मूल आईच्या गर्भात केवळ एक मांसाचा गोळा असतो. त्याच्यासाठीच तारुण्यात तिला वरचेवर मासिक पाळी येते, जी प्रत्येक महिन्याला तिला तीन ते सात अथवा दहा दिवसांपर्यंत कोणत्याही मोठ्या जबाबदारीचा भार उचलण्यास आणि कोणतेही महत्त्वपूर्ण शारीरिक अथवा मानसिक कार्य करण्यालायक ठेवीत नाही. त्या बाळासाठीच तिला गर्भावस्थेत व त्यानंतर संपूर्ण वर्षभर तिला कष्ट सहन करावे लागतात. या काळात प्रत्यक्षत: ती अर्धप्राण बनते. स्तनपानाच्या काळात संपूर्ण दोन वर्षे असे गुदरतात की ती आपल्या रक्ताने मानवतेची शेती सिंचित करीत असते आणि तिला आपल्या छातीच्या कालव्यानी सिंचित राहते. मुलाचे पालनपोषण सुरूवातीच्या काळात करण्यासाठी तिला इतके परिश्रम व अडचणींना तोंड

द्यावे लागते की, तिची रात्रीची झोप व दिवसाची विश्रांती नाहीशी होते. ती आपले सुख, आपला आनंद, आपली प्रसन्नता, आपली इच्छा; तात्पर्य असे की ती प्रत्येक वस्तू येणाऱ्या पिढीला समर्पित करते.

## स्त्री–पुरुष समानता

जेव्हा स्थिती अशी आहे तेव्हा विचार करा न्याय्य गोष्ट कोणती आहे? काय न्याय असा आहे स्त्रीकडून त्या नैसर्गिक जबाबदाऱ्यांच्या पूर्ततेची अपेक्षा केली जावी, ज्यात पुरुष तिचा भागीदार नाही आणि उलट त्या सांस्कृतिक जबाबदाऱ्यांचा भारसुद्धा त्या पुरुषाच्या बरोबरीने टाकला जावा जो उचलण्यासाठी पुरुषाला नैसर्गिक जबाबदाऱ्यांपासून मुक्त ठेवले गेले आहे? मग तिला असे म्हणावे काय की ते सर्व संकटसुद्धा सहन कर जे निसर्गाने तुझ्यावर घातले आहेत आणि मग आमच्या बरोबरीने रोजी कमविण्याचे कष्टसुद्धा सहन कर राजकारण, न्यायलये, उद्योगधंदे, व्यापार व शेती आणि शांतीस्थापना व देशाच्या संरक्षण सेवेतसुद्धा समान रूपाने भाग घे. आमच्या समाजात येऊन आमचे मनोरंजन कर आणि आमच्याकरिता भोग-विलास व आमोद-प्रमोदाची सामग्रीसुद्धा एकत्र कर? हा न्याय नव्हे तर अन्याय आहे. ही समानता नसून स्पष्ट विषमता आहे. न्याय गोष्ट तर अशी आहे की, जिच्यावर निसर्गाने अत्याधिक भार घातला आहे तिला लहानात लहान व साधारण कामे दिला जावीत आणि ज्याच्यावर निसर्गाने कोणताही भार टाकलेली नाही त्याच्यावर समाजाची महत्वपूर्ण व अधिक परिश्रमाच्या कामाचा भार टाकला जावा आणि त्याच्यावरच ही जबाबदारी टाकावी की, त्याने कुटुंबाचे भरणपोषण व त्याचे संरक्षण करावे.

केवळ इतकेच नव्हे की, स्त्रीवर घरच्या व बाहेरील जबाबदाऱ्या लादणे जुलूम आहे तर खरे पाहता ती त्या सेवा पुऱ्या करण्यास पूर्णपणे योग्यसुद्धा नाही, ज्याचा उल्लेख वर आला आहे. ही कार्ये करण्यासाठी तेच कार्यकर्ते उपयुक्त ठरतील ज्यांची कार्यक्षमता कायमस्वरूपी असते. जे निरंतर व अविराम आपापली कर्तव्ये योग्यपूर्वक पूर्ण करू शकतात आणि ज्यांच्या मानसिक व शारीरिक शक्तीवर विश्वास केला जाऊ शकतो. परंतु ज्या कार्य करणाऱ्यावर नेहमी प्रत्येक महिन्याला एका दीर्घ मुदतीसाठी अयोग्यतेची अथवा योग्यतेत ऱ्हासाची पाळी येत असेल आणि त्यांची कार्यक्षमता वरचेवर अपेक्षित प्रमाणापेक्षा कमी होत असेल ते या जबाबदाऱ्यांचा भार कसे उचलू शकतील? त्या सेनेची अथवा नौदलाची कल्पना करा जी शुद्ध स्त्रियांची आहे आणि ज्यांच्यापैकी ऐन युद्धकाळात अनेक टक्के स्त्रिया मासिक पाळीमुळे अर्धनिकामी झाल्या आहेत, एक भली मोठी संख्या बाळंतीण होऊन अंथरूणावर पडली आहे आणि एक मोठी संख्या गर्भावतींची आहे, ज्या काम करण्यास असमर्थ आहेत. सैन्याचे उदाहरण दिल्यामुळे

आपण म्हणाल की हे अत्यंत कठोर कर्तव्याचे उदाहरण आहे. परंतु पोलीस, न्यायालय, मॅनेजर, दूतावासातील सेवा, रेल्वे, उद्योगधंदे आणि व्यापारासारखी अशी कोणती कामे आहेत ज्यात निरंतर विश्वसनीय कार्यक्षमता असलेल्या लोकांची गरज असत नाही? म्हणून जे लोक स्त्रियांकडून पुरुषांची कामे करून घेऊ इच्छितात त्यांचा कदाचित असा उद्देश्य असेल की एकतर सर्व स्त्रियांना 'अस्त्री' बनवून मानवजात समाप्त केली जावी. अथवा स्त्रियांपैकी काही टक्के स्त्रियांना 'अस्त्री' बनण्याच्या शिक्षेसाठी निवडण्यात येत राहावे किंवा सर्व सांस्कृतिक बाबीसाठी क्षमता व योग्यतेचा स्तर सामान्यपणे खाली आणावा.

परंतु आपण यापैकी कोणतेही रूप स्वीकारले तरी स्त्रीला पुरुषांच्या कामासाठी तयार करणे निसर्गाच्या अपेक्षा व सिद्धान्तांच्या अगदी विपरीत आहे व तसे करणे मानवतेसाठीही लाभदायक नाही की खुद्द स्त्रीसाठीसुद्धा. ज्याअर्थी जीवशास्त्राप्रमाणे स्त्रीला मुलांना जन्म देण्यासाठी व त्यांचे पालनपोषण करण्यासाठी बनविले गेले आहे त्या अर्थी मानसशास्त्राच्या क्षेत्रातसुद्धा तिच्या ठायी त्याच क्षमता ठेवल्या गेल्या आहेत ज्या तिच्या नैसर्गिक कर्तव्यासाठी उपयुक्त आहेत, अर्थात प्रेम, सहानुभूती, सौहार्द्र, श्रद्धा हृदयआर्द्रता, अनुभवाची तीव्रता आणि भावनांची कोमलता. याशिवाय ज्या अर्थी सजातीय जीवनात पुरुषाला क्रियेचे व स्त्रीला कर्मांचे स्थान दिले गेले आहे त्याअर्थी स्त्रीमध्ये तेच सर्व गुण उत्पन्न केले गेले आहेत जे तिला जीवनाच्या कर्मप्रधान बाजूने काम करण्यास तयार करतात. तिच्यात क्रूरता व कठोरतेऐवजी प्रभावित होण्याचा गुण आहे. क्रियेच्या जागी क्रियेचे फळ बनणे होय आणि ताठरपणाऐवजी नम्र बनण्याची व ढळण्याची क्षमता आहे. साहस व धैर्याऐवजी तिच्यात नकार, पलायन व अडथळा आहे. ही वैशिष्ट्ये बाळगून काय ती कधी या कार्यासाठी उपयोगी ठरू शकेल आणि त्या जीवनक्षेत्रात काम करू शकते ज्यात तीव्रता, रक्षण व सहिष्णुतेची गरज आहे, ज्यात कोमल भावनांऐवजी दृढसंकल्प व स्पष्ट मतांची गरज असते? संस्कृतीच्या या विभागाला स्त्रीला ओढून आणणे स्वत: तिला नष्ट करणे व त्या विभागांनासुद्धा नष्ट करणे होय.

यात स्त्रीचा उत्कर्ष नसून पतन आहे. उत्कर्ष याला म्हणत नाहीत की, एखाद्याच्या नैसर्गिक क्षमतांचे दमन करावे व नष्ट करावे आणि त्यात कृत्रिमपणे त्या क्षमता उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला जावा ज्या नैसर्गिकरीत्या त्याच्यात नाहीत; तर

विकास याचे नाव आहे की नैसर्गिक क्षमतांचा विकास करण्याची संधी देण्यात यावी. त्यांना परिष्कृत करावे व प्रकाशमान बनवावे. त्यांच्या उत्तमोत्तम कार्यासाठी संधी निर्माण केल्या जाव्यात.

यात स्त्रीचे यश नसून अपयश आहे. जीवनाच्या एका पैलूने स्त्री अबला आहे व पुरुष सबल आहेत. दुसऱ्या पैलूने पुरुष निर्बल आहेत तर स्त्रिया बलवान. तुम्ही बिचाऱ्या स्त्रियांना त्या पैलूने पुरुषाच्या तुलनेत आणता ज्यात ती निर्बल आहे. याचा निश्चितपणे असा परिणाम होईल की, स्त्रिया सदैव पुरुषापेक्षा हीन दशेत राहतील. तुम्ही जरी कितीही उपाय केले तरी हे संभव नाही की स्त्रियांमधून ॲरिस्टॉटल, इब्ने सीना, केंट, हेगल, खय्याम, शेक्सपियर, ॲलेक्झॅन्डर, नेपोलियन, सलाहुद्दीन, निजामुलमुल्क, फिरदोसी तूसी आणि बिस्मार्कच्या तोडीची एखादी व्यक्ती निर्माण व्हावी आणि संपूर्ण जगातील पुरुषांनी कितीही डोके लढविले तरी ते आपल्या पुरुषजातीतून एक सामान्य दर्जाची आई प्रस्तुत करू शकणार नाही.

यात खुद्द संस्कृतीचा लाभ नसून हानी आहे. मानवजीवन व सभ्यतेला जितकी आवश्यकता तीक्ष्णता, तीव्रता व कठोरतेची आहे तितकीच गरज कोमलता, सहृदयता आणि मवाळपणाची आहे. जितकी गरज चांगल्या नीतिज्ञांची व उत्तम प्रशासकांची आहे तितकीच आवश्यकता उत्तम माता, चांगल्या गृहिणींची आहे. दोन्ही तत्वांपैकी कोणालाही नष्ट केल्यास संस्कृतीला त्याचे परिणाम भोगावे लागतील.

हे ते कार्य-विभाजन आहे जे खुद्द निसर्गाने मनुष्याच्या दोन्ही जातींदरम्यान केले आहे. जीवशास्त्र, इंद्रियशास्त्र, मानसशास्त्र व समाजशास्त्राचे संपूर्ण ज्ञान या विभाजनाकडे संकेत करतात. मुलाला जन्म देणे व त्याचे पालन करण्याची सेवा स्त्रीकडे असावी हे एक असले निर्णायक तथ्य आहे जे स्वत:च मानवसंस्कृतीत त्याच्यासाठी एक कार्यक्षेत्र निश्चित करते व एखाद्या कृत्रिम पद्धतीत ही शक्ती नाही की निसर्गाच्या या निर्णयाला तिने बदलून टाकावे. सभ्य संस्कृती तीच असू शकते जी हा निर्णय जसाचा तसा स्वीकारते आणि तिच्यावर फक्त घरच्या जबाबदारीचा भार घालते. घराबाहेरच्या जबाबदाऱ्या व कुटुंबाचे नेतृत्व पुरुषाकडे देते. जी संस्कृती ही वाटणी नष्ट करण्याचा प्रयत्न करील ती अस्थायी रूपाने भौतिक प्रगती व मानमर्यादेचे थोडेफार प्रदर्शन तर करू शकेल. पण सरतेशेवटी असल्या संस्कृतीचा विनाश निश्चित आहे कारण जेव्हा स्त्रीवर पुरुषाप्रमाणे आर्थिक जबाबदाऱ्यांचा भार घातला जाईल तेव्हा ती आपल्यावरील

नैसर्गिक जबाबदाऱ्यांचे ओझे टाकून देईल आणि त्याच्या परिणामस्वरूप केवळ संस्कृतीच नव्हे तर खुद्द मानवतेचा विनाश होईल. स्त्रीने जर आपल्या भावुकता व आपल्या नैसर्गिक रचनेच्या विरुद्ध एखादा प्रयत्न केला तर कोणत्या न कोणत्या सीमेपर्यंत ती पुरुषाचा सर्व भार वाहून नेईल. परंतु पुरुष कोणत्याही प्रकारे स्वत:ला मुलांना जन्म देण्यास व त्यांचे पालनपोषण करण्यास योग्य बनवू शकणार नाही.

निसर्गाचे हे कार्यविभाजन लक्षात ठेवून कुटुंबाची जी रचना व समाजात पुरुष व स्त्रीच्या कर्तव्यांचे जे निर्धारण केले जाईल त्यांचे स्वरूप निश्चितच खालीलप्रमाणे राहील-

१. कुटुंबासाठी रोजी कमविणे, त्याच्या संरक्षण, प्रतिरक्षा व संस्कृतीच्या उद्यमी सेवांची पूर्तता करणे पुरुषाचे कर्तव्य असावे आणि त्याचे शिक्षण-प्रशिक्षण अशा प्रकारचे असावे की ते या उद्देश्यासाठी जास्तीतजास्त लाभदायी ठरावे.

२. मुलांचे पालनपोषण, गृहस्थीची कर्तव्ये आणि गृहस्थ जीवनाला शांती व सुख-स्वर्ग बनविणे स्त्रीचे कार्य आहे आणि त्याला उत्तम शिक्षण-प्रशिक्षणाद्वारे याच उद्देश्यासाठी तयार केले जावे.

३. कुटुंबव्यवस्था टिकवून ठेवणे आणि तिचे अराजकतेपासून रक्षण करण्यासाठी एका व्यक्तीला योग्य सीमेत आवश्यक प्रभुत्व प्राप्त असावे जेणेकरून कुटुंबाने बिनमुंडक्याचे सैन्य बनून राहू नये. अशी व्यक्ती केवळ पुरुषच असू शकते, कारण ज्या कुटुंबाच्या सदस्याची मानसिक व आंतरिक स्थिती वारंवार मासिक पाळीमुळे व गर्भावस्थेमुळे बिघडत असेल कोणत्याही परिस्थितीत या अधिकारांचा प्रयोग करण्यास योग्य असू शकत नाही.

४. सांस्कृतिक व्यवस्थेत हे विभाजन व प्रशिक्षमण आणि संगठन स्थिर ठेवण्यासाठी आवश्यक सुरक्षाव्यवस्था केली जावी जेणेकरून निर्बुद्ध व्यक्तीने आपल्या मूर्खपणाने पुरुष व स्त्रियांच्या कार्यक्षेत्रांची मिसळ करून या सभ्य सांस्कृतिक व्यवस्थेला नष्ट-भ्रष्ट करता कामा नये.

–०– समाप्त –०–